# चंद्रमंडळ

(स्वतंत्र सामाजिक नाटक)

प्रभाकर केशव ठोसर.

किंमन १ रुपया

# चंद्रमंडळ

या प्रस्तावनेंत वस्तुत: मला आभारप्रदर्शनाचेंच कार्य करावयाचें आहे. माझे स्नेही व ऑल इंडिया रिपोर्टर छापखान्याचे व्यवस्थापक श्री. धुं. गो. रानडे यांनीं अत्यंत सुबक रीतीनें हें पुस्तक छापलें आहे. याबद्दल त्यांचे आभार मानणेंच अत्यंत योग्य; परंतु तसें करणें त्यांना रुचणार नाहीं म्हणून त्यांनीं पुस्तकमुद्रणाच्या बाबतींत दाखविलेल्या तत्परतेचा नुसताच निर्देश करतों. त्यांनीं नाटक वाचून अनेक बहुमोल सूचनाही केल्या आहेत.

रा. रा. वें. शा. बलकुंदी, बी. ए., एल्‌एल्. बी. यांनींहि संपूर्ण नाटक वाचण्याचे परिश्रम घेऊन पुष्कळ उपयुक्त सूचना केल्या. तद्वतच पुस्तक-मुद्रणाच्या बाबतींत रा. भास्करराव मुदलियार यांनीं फार दक्षता घेतली आहे. याबद्दल त्या उभयतांचे आभार मानणेंच इष्ट आहे. त्याचप्रमाणें शिवराज फाइन आर्ट लिथो प्रेसचे रा. शिरोळकर यांनीं मुखपृष्ठ आकर्षक करण्याचे बाबतींत जी मेहनत घेतली त्याबद्दल त्यांचेहि मी आभार मानतों.

नागपूर<br>वर्षप्रतिपदा<br>शके १८६६.

**प्रभाकर केशव ठोसर.**



## नाटकांतील पात्रें.

| | | |
|---|---|---|
| भाऊसाहेब | ... | एक जहागिरदार |
| नानासाहेब | ... | ,, |
| चंद्रिका | ... | भाऊसाहेबांची भाची |
| नलिनी | ... | ,, मुलगी |
| मंदार | ... | एक तरुण गृहस्थ |
| अनिरुद्ध | ... | ,, ,, ,, |
| गिरिजाबाई | ... | भाऊसाहेबांची पत्नी |
| तोटक | ... | नानासाहेबांचा कारकून |

डॉक्टर, नोकर, तारवाला वगैरे.

## स्थलकालनिर्देश.

नाटकांतील प्रसंग मुंबईपासून १५ मैलांवर, चांदिवली या खेडे-गांवीं घडून आलेले आहेत असें समजावें. आणि नाटकांतील एकंदर घटना सात दिवसांच्या आंत घडून आली आहे. अंक ४ व ५ यामध्यें तीन दिवसांचें अंतर आहे.

॥ श्री ॥

# चंद्रमंडळ

## (स्वतंत्र सामाजिक नाटक.)



## अंक १ ला



(**स्थळ**—भाऊसाहेब जहागिरदारांचा प्रशस्त वाडा. या वाड्यांत वरच्या मजल्यावरील एका दालनांत, मध्यें एक पार्टिशन टाकून दोन खोल्या केल्या आहेत. पैकीं, एका खोलींत भाऊसाहेब जहागिरदार सचिंत बसले आहेत. त्यांच्या हातांत एक पत्र आहे. दुसऱ्या खोलींत त्यांची भाची, चंद्रिका, पेटी वाजवीत बसली आहे. दालनाला लागूनच गॅलरी आहे.)

**भाऊसाहेब**— चंद्रिके, ए चंद्रिके! तुझी पेटी बंद कर पाहूं जरा. (थोडा वेळ थांबून) पण बिचाऱ्या चंद्रिकेचा तरी काय अपराध आहे! माझंच मन अप्रसन्न तेव्हां बिचाऱ्या पेटीचे सूर तरी मला कसे गोड लागणार? चंद्रिके—

(चंद्रिका भाऊसाहेबांच्या खोलींत प्रवेश करते.)

**चंद्रिका**—मामा, त्रास झाला का तुम्हांला? बंद करते हं मी पेटी. मग जरा वेळानं वाजवीन मी आपली.

**भाऊ०**—चंदा, तूं मोठी गोड पोरगी आहेस! वास्तविक तुझ्या पेटीचे सूर पहिल्याइतकेच गोड असतील पण आज त्यांच्यापासून माझी

करमणूक होत नाहीं खरी. तुझ्या ऐवजीं नलिनी असती तर आतां तिनं माझ्याशीं किती वाद घातला असता? पण खरंच, नलिनी मघापासून कुठें दिसली नाहीं ती?

**चंद्रिका** — ती किनई नदीवर पोहायला गेली आहे.

**भाऊ०** — अन् एकटीच?

**चंद्रिका** — नलिनी धीट आहे. पण मामा, तुम्हांला एक प्रश्न विचारूं कां?

**भाऊ०** — कसला! स्वत:च्या लग्नाचा?

**चंद्रिका** — इश्श! हें हो काय?

**भाऊ०** — काळजी करूं नकोस! मी तुला सुद्धां असा नवरा पाहून देईन कीं —

**चंद्रिका** — तुमची आपली भलतीच चेष्टा! मी तें नाहीं विचारीत. मामा, जवळ जवळ महिना झाला, तुम्ही कसल्या तरी चिंतेंत आहां; पण तुम्ही कोणाला सांगत नाहीं. सांगा ना काय आहे तें?

**भाऊ०** — पोरी, तुला सांगण्यासारखं नाहीं तें! जा, आतां मला अगदीं एकांत हवा आहे. तेव्हां तूं आपल्या खोलींत जा कशी! जा, कांहीं तरी वाच जा. मला अगदीं एकटा राहूं दे.

(चंद्रिका चमत्कारिक मुद्रा करीत आपल्या खोलींत जाते; तोंच गिरिजाबाई प्रवेश करतात.)

**भाऊ०** — एकांत हवा म्हणून चंद्रिकेला पिटाळून लावली अन् आतां हें आमचं अर्धांग पुढं येत आहे! आल्याच, या बाईसाहेब!

चंद्रिकेची पेटी बंद करविली पण हिचं टुमणं आतां ऐकून घेणं भागच आहे!

(गिरिजाबाई येऊन एका खुर्चीवर बसतात.)

**गिरिजा०**—कां, आज एवढा विचार कसला चालला आहे?

**भाऊ०**—संन्यास घ्यावा कीं काय याचा! पण म्हणतात ना संन्यास घ्यायला सुद्धां बायकोची परवानगी लागते. कायग, समज मी संन्यास घ्यायचा विचार केला तर देशील कां तूं परवानगी?

**गिरिजा०**—इश्श! ही काय भलतीच चेष्टा! संन्यास घेण्याचं वय तरी आहे कां आपलं! खरं म्हटलं तर या वयांत कांहीं पुरुषांचीं लग्नं सुद्धां होतात आणि अगदीं तरण्याताठ्या मुली त्यांना मिळतात!

**भाऊ०**—त्या मुलींच्या बापांना पैसे भरून तशीं लग्नं होत असतील खरीं! पण तूं जिवंत असल्यामुळें माझा नाईलाज आहे!

**गिरिजा०**—बाई बाई बाई! शर्थच झाली म्हणायची! म्हणजे मी जिवंत आहें म्हणून संन्यास घ्यायची तयारी आणि मी मेल्यें कीं मात्र पुनः तुम्ही लग्न करणार! पण मी इतकी नकोशी झालें असल्यें तर करानात कां पुनः लग्न! मी कशाला आड येऊं! आतां मुलींच्या लग्नाच्या गोष्टी बोलायच्या कीं स्वतःच्या लग्नाच्या! मोठ्या होत चालल्या मुली आतां!

**भाऊ०**—त्या लहान होत चालल्या आहेत असं मी सुद्धां म्हणत नाहीं! पण त्यांच्या मनाजोगता नवरा, व तुझ्या व माझ्या मनाजोगता जांवई हे तीन गुण ज्या पुरुषांत दिसतील तोच शेवटीं प्रत्येकीला पसंत केला पाहिजे! आज काल, नवऱ्यांच्या बाबतींत मुलींना विचारलेलं बरं!

**गिरिजा०**—कांहीं तरीच बोलायचं आपलं! आमच्या वेळेला नव्हतं कुणी मुलींना आणि मुलांना विचारीत! आतां चोचलेच फार. परवांच मी ऐकलं कीं, एक मुलगा मुलगी पहायला गेला होता तेव्हां मुलीनंच मुलाला प्रश्न विचारले! छेः ग बाई! काय ऐकावं तें नवलच!

**भाऊ०**—मला यांत नाहीं नवल वाटत! द्यावं तसं घ्यावं हा निसर्गाचा न्यायच आहे. आजपर्यंत मुली पाहण्याच्या निमित्तानं, मुलांनीं मुलींची कांहीं थोडी नाहीं केली विटंबना; तोच प्रयोग आतां मुलांवर होऊं लागला तर त्यांत नवल तें काय!

**गिरिजा०**—पुरं मेलं तें! पण मगाशीं एवढा विचार कसला चालला होता?

**भाऊ०**—(एक लिफाफा पुढें करून) या लिफाफ्यांतला मजकूर वाच म्हणजे तुला कळेल.

**गिरिजा०**—अग बाई! आहे तरी काय त्यांत एवढं? (मोठ्यानें वाचूं लागते; चंद्रिका आपल्या खोलींतून लक्षपूर्वक ऐकत असते.) "सा. न. वि. वि. तुम्हांस आम्ही प्रॉमिसरी नोटवर ५०००० ची रक्कम दिलेली आहे. या रकमेची फेड करण्याबद्दल तुम्हांस आम्ही मागेंच एक पत्र लिहिलें होतें; परंतु, महिना झाला तरी त्या पत्राचा आपल्या-कडून जबाब नाहीं याचें आश्चर्य वाटतें; तरी हें दुसरें पत्र पोंचल्या-पासून चार दिवसांच्या आंत आमच्या रकमेची फेड करावी; तसें शक्य नसल्यास तुमचा राहता वाडा आम्ही तुमच्यापासून विक्री करून घ्यावयास तयार आहोंत; उगाच वकीलांकडे जाऊन, कोर्टांत कारवाई करीत बसणें तुमच्या व आमच्याहि नांवलौकिकाला कमीपणा आणणारें

आहे. तरी चार दिवसांच्या आंत या गोष्टीची तजवीज करावी. पत्राचा राग मानूं नये. आपला नानासाहेब जहागिरदार." अगबाई ! म्हणजे, अगोदर एक पत्र येऊन महिना झाला वाटतं ; अन् मला हें सांगितलं सुद्धां नाहीं !

**भाऊ०** — तूं काय याचा परिहार करणार होतीस ? उगाच तुझ्या चिंतेंत भर कशाला पाहिजे ?

**गिरिजा०** — (सुस्कारा टाकून) कठीण प्रसंग आला आहे खरा ! पण मी म्हणतें नानासाहेब आपले स्नेही, अन् हें कसं त्यांच्या मनांत आलं ! तरी मी पहिल्यापासून आपल्याला सांगत होतें कीं खर्च आटो-क्यांत ठेवा. पहिल्यापासूनच हात राखून वागणं झालं असतं तर आज ही पाळी कशाला आली असती !

**भाऊ०** — अस्सं ! एकूण आपण माझ्यावरच खापर फोडलंत म्हणायचं ! पुरुषांना टकलं कां पडतात हा प्रश्न मला बरेच दिवस सुटला नव्हता तो आज सुटला म्हणायचा ! संसारांतील कर्ता पुरुष या न्यायानं प्रत्येक गोष्टीचं खापर त्याच्या डोक्यावर फुटून त्याच्या डोक्याचा वस्तऱ्याशिवायच गुळगुळीत गोटा झाला तर त्यांत नवल तें काय ! पुरुषाच्या टकलाची म्हणजे गुळगुळीत डोक्याची ही मीमांसा झाली ; स्त्रियांचे ओठ गुळगुळीत असतात त्यालाहि असंच कांहीं तरी कारण असलं पाहिजे. त्यांच्या तोंडाच्या पट्ट्याला भिऊन केसांना तेथें ठाणं देण्याची छातीच होत नसावी !

**गिरिजा०** — आलेल्या प्रसंगाला तोंड देण्याऐवजीं स्त्रियांच्या तोंडाची मीमांसा बरी सुचते तुम्हांला !

**भाऊ०** — त्याचं कारणच तसं आहे. जो स्त्रीच्या तोंडाला तोंड देतो तो कोणत्याहि प्रसंगाला तोंड देतो. बरं पण, हें राहूं दे आतां सारं! नानासाहेबांच्या रकमेची भरती करायला आपल्याजवळ रोकड तर नाहींच; तुझे दागिने—

**गिरिजा०** — (झटक्यानें) मी नाहीं माझी दागिने द्यायची! सोन्याची वस्तू, एकदां गेली कीं पुनः होत नाहीं!

**भाऊ०** — अगदीं बरोबर! म्हणूनच सोन्यासारखा नवरा असं म्हणण्याचा प्रघात पडला असावा; एकदां हातांतून गेला कीं पुनः मिळायचा नाहीं!

**गिरिजा०** — इश्श!

**भाऊ०** — तुझ्याजवळ जें देण्यासारखं आहे तें तूं द्यायला तयार नाहींस. अर्थातच मजजवळ जें देण्यासारखं आहे तें दिल्याखेरीज गत्यंतरच नाहीं.

**गिरिजा०** — म्हणजे! नानासाहेबांना वाडा विकणार वाटतं?

**भाऊ०** — अक्कल गहाण पडली कीं वाडे विक्रीस निघण्यास उशीर कसला! या वाड्याला जर आमच्याजवळ नांदायचं नसलं, त्याला आमचा कंटाळा यावा असं जर आम्ही कांहीं केलं असलं तर त्यानं आमच्याशीं काडीमोड कां करूं नये?

**गिरिजा०** — आणि वाडा विकल्यावर मग भाड्याच्या घरांत रहायचं कीं काय?

**भाऊ०** — दिवसेंदिवस आतां भाड्याच्याच घरांत राहणारे लोक अधिक सांपडतात. कांहीं बिनभाड्याच्या घरांतहि रहातात! पण

आपल्याला आपलं भाड्याचंच घर बरं! भाड्याच्या घरांत राहून शेती-बागाइतीवर जें कांहीं उत्पन्न येत आहे त्यावरच निर्वाह करणें आतां क्रमप्राप्त आहे.

**गिरिजा०** — पण एवढा मोठा वाडा! विकायचा अन् दुसऱ्याच्या ताब्यांत द्यायचा म्हणजे कसंसंच वाटतं. आपणहि कांहीं थोडाथोडका खर्च केला नाहीं वाड्यावर.

**भाऊ०** — आपल्या स्वत:साठीं झालेल्या खर्चापेक्षां कमीच असेल. पण तें कसंही असो. प्रस्तुत संकटांतून मुक्त होण्यासाठीं वाड्याचा जेवढा उपयोग होईल तितका माझा स्वत:चा सुद्धां होणार नाहीं. माझ्या या साडेतीन हात देहाची किंमत पन्नास हजार रुपये थोडीच येणार आहे! माणसाची किंमत पैशावर असते हें आतां मात्र मला निखालस खोटं वाटूं लागलं आहे!

**गिरिजा०** — मला वाटतं नानासाहेबांना कांहीं दिवस थांबायला सांगावं! थोडी फार आणखी मुदत मागून घ्यावी.

**भाऊ०** — आणखी मुदत मागण्यांत काय स्वारस्य आहे! त्या मुदतींत पैसे उत्पन्न होणार आहेत थोडेच? ईश्वरानं सगळीं बीजं उत्पन्न केलीं पण पैशाचं बीज त्याला सुद्धां उत्पन्न करतां आलं नाहीं. आतां यक्षिणीची कांडी फिरून, एखाद्या अकल्पित ठिकाणीं जर पैशाचा सुगावा लागला तर कोणास ठाऊक!

**गिरिजा०** — इश्श! तसं म्हणजे तें आपलं नाटक कादंबऱ्यां-तून होतं. खरंच जर तसं झालं असतं तर संकटाची कोणी काळजी

केलीच नसती. पण मला बाई वाटतं कीं नानासाहेबांना भेटून, नीट विचार करण्यासाठीं आणखी कांहीं मुदत मागावीच.

**भाऊ०**—विचार करण्यासाठीं मुदत! हिंदुस्तानच्या स्वराज्याचा हप्त्याहप्त्यानें विचार करणाऱ्या इंग्रज सरकारसारखीच तूं बनलेली दिसतेस. दोन हप्ते देण्यांतच दोन तपं निघून गेलीं!

**गिरिजा०**—पण मी म्हणतें लिहावं तर खरं नानासाहेबांना पत्र आणि घ्यावी थोडीशी मुदत मागून.

**भाऊ०**—गावांतल्या गावांत कशाला पत्र? मी आज संध्याकाळींच नानासाहेबांना भेटून येतों. बघावं त्यांनीं मुदत वाढविली तर! आजचं मरण उद्यांवर!

(इतक्यांत खालून 'भाऊसाहेब आहेत का' अशी हांक ऐकूं येते. गिरिजाबाई सज्जांत येऊन पाहते.)

**गिरिजा०**—(पुनः आंत येऊन) अगबाई! नानासाहेबांचा कारकून तोटक! कशाला आलाय् मेला कोणास ठाऊक!

**भाऊ०**—हं! आज तो आपल्याला 'मेला' वाटायचाच! पत्रहि आजच आणि हा तोटकहि आजच येत आहे! काय आहे तें कळत नाहीं! याहो तोटकसाहेब! वर या.

(गिरिजाबाई चंद्रिकेच्या खोलींत जाते. तोटक, डोक्याला कसा तरी गुंडाळलेला फेटा, गळ्याशीं मळकटलेला मफलर, लक्षांत येण्यासारखी वाढलेली दाढी, ओंठावर दाभणकांठी मिशा, नाकावर चार आणे किंमतीची आरशी आणि हातांत काठी अशा थाटांत वर येतो. तो खालीं बैठकीवरच बसूं पाहतो.)

**भाऊ०**– या हो, असे वर बसा; खुर्चीवर बसा!

**तोटक**—छे! छे! हें काय भलतंच! खुर्चीवर बसून आपल्या पायरीला पाय लावूं म्हणतां! नानासाहेब आणि आपण आम्हांला सारखेच! खरं म्हटलं तर माझ्यासारख्यानं आपल्यापुढें उभंच रहायला हवं!

**भाऊ०**—अहो! तसं नव्हे; खुर्चीवर बसलं म्हणजे बोला-चालायला सोइचं पडतं. बसा ना! बसा असे खुर्चीवर.

**तोटक**—(खुर्चीवर बसतो) छे बुवा! तुमच्या आग्रहापुढें अगदीं नाईलाज आहे. अगदीं थेट आमच्या नानासाहेबांसारखा तुमचा आग्रह आहे. तसे ते स्वभावानं आग्रही नाहींत बरं का! स्वभावानं अगदीं सरळ! पण एखाद्याला एखाद्या गोष्टीचा आग्रह करण्यांत फारच पटाईत! एक दिवस काय मजा झाली—तुमच्या आमच्यांतच आहे हें बरं का— अशी मजा झाली, आपण कांहीं नानासाहेबांसमोर विडी ओढत नाहीं—

**भाऊ०**—असं म्हणतां! मालकाच्या समोर विडीचा धूर न काढण्यांत आपल्या डोळ्यावर धूर आला नाहीं हेंच दर्शविण्याचा तुमचा हेतु असावा!

**तोटक**—वा! फारच छान! आपल्याला कांहीं असं बोलणं जमत नाहीं बुवा! अहो आमची ती — म्हणजे बायको आमची — मला याबद्दल दोष सुद्धां देते! ती म्हणते तुम्हांला बोलायलाच येत नाहीं—

**भाऊ०**—म्हणज घरीं तिच्यासमोर तुम्ही कांहीं बोलतच नाहीं वाटतं!

**तोटक**—ह्यः ह्यः! खाजगी गोष्ट आहे ही! पण तुम्हांला सांगतों. अहो ती अशी कांहीं बोलत असते कीं मला घरांत बोलायचं

कारणच पडत नाहीं. पहांटेला जागं व्हायचं म्हणून मला आजपर्यंत कधींच गजर लावावा लागला नाहीं. ती पहांटे उठली कीं जाग आलीच पाहिजे. अगदीं घड्याळाच्या गजरासारखाच आवाज आहे तिचा! मला पुष्कळदां असं वाटतं कीं तिचा आवाज एखाद्या घड्याळाच्या कंपनीला सर्व हक्कांसहित विकत द्यावा!

**भाऊ०**—अहो पण तुमची ती मजा सांगायची राहिलीच कीं!

**तोटक**—अरेच्या! खरंच! विसरलोंच मी! बायकांच्या गोष्टी निघाल्या कीं व्हायचंच असं म्हणा! काय मजा झाली पहा! मी नानासाहेबांच्या समोर कधींच विडी ओढत नाहीं. पण एक दिवस त्यानीं मला विडी ओढतांना पाहिलं. लगेच दुसरे दिवशीं सकाळीं मला बोलावून म्हणतात, 'तोटक्या, तूं आमचा एक गुन्हा केला आहेस!' मी अगदीं घाबरून गेलों हें ऐकून! इतकीं वर्षं नोकरी केली पण गुन्हा झाल्याचं कांहीं स्मरणांत नव्हतं! अहो महिना सव्वासात रुपयांचे तीस रुपये याच नोकरीवर झाले ना मला! अहो सिलव्हर जुबिली का काय म्हणतात, तें करण्याइतकीं म्हणजे पंचवीस वर्षं नोकरी झाली माझी! अन् हो बरी आठवण झाली! माझ्या लग्नाला सुद्धां पंचवीस वर्षंच झालीं!

**भाऊ०**—अस्सं! म्हणजे तुमच्या लग्नाची सुद्धां सिल्व्हर ज्युबिली करायची वेळ आली आहे! पण तुमच्या या सिल्व्हर ज्युबिलींत तुमची मजा तर मागेंच पडते आहे बिचारी!

**तोटक**—वा! सांगतों! सर्व कांहीं सांगतों! अहो, म्हणजे माझी नोकरी व बायको या उभयतांत तसाच कांहीं संबंध आहे!

**भाऊ०** — तोटक! काय बोलतां तुम्ही हें! छे: छे: असं कांहीं बोलायचं असलं तर—

**तोटक** — आं! अहो तसं नाहीं कांहीं बरं का! तुम्ही समजतां तसं नाहीं बरं कां! विष्णवे नमः! अहो, मला सांगायचं इतकंच कीं ज्या दिवशीं मला नोकरी लागली त्याच दिवशीं मला ही आमची बायको सांगून आली!

**भाऊ०** — किंवा त्या दिवशीं मुलगी सांगून आली आणि तीच तुमची बायको झाली!

**तोटक** — अगदीं वाजवी अन् कांटेतोल बोलणं आहे हें! पुढं सांगायचं असं कीं धनीसाहेबांचे ते शब्द ऐकून मी फारच घाबरलों. धनी पुढें म्हणाले 'तोटक्या तूं आमचा कारकून आहेस, तुला विडी ओढणं शोभत नाहीं, तूं सिगारेट ओढीत जा.' मी म्हटलं 'मालक, मी गरीब मनुष्य, सिगारेट कोठून आणूं?' ते काय म्हणतात 'अच्छा तुझं सिगारेटचं बिल आमच्याकडे पाठवून देत जा.' कचेरींत काम करीत असतांना, लागेल तितका वेळ चहा त्यांच्याकडून येतच असे म्हणा, पण आतां सिगारेटहि सुरू झाली! कृपा त्यांची, दुसरं काय?

**भाऊ०** — तुम्हांला नानासाहेबांनीं चहा आणि सिगारेटची सवलत दिली यावरून तुमच्याविषयीं ते जितके आर्द्र तितकेच कडक आहेत असं स्पष्ट दिसतं!

**तोटक** — छान! फारच छान! फारच सुरेख कोटी झाली बुवा! एखाद्या सुग्रण बाईनं खुमासदार लसणीची चटणी करावी तशीच तुमची कोटी वाटली मला! आमचे मालक तुमच्या कोटीबाजपणाची

नेहमीं तारीफ करीत असतात. भाऊसाहेबांसारखा कोटीबाज इसम आपल्या या प्रांतात तरी दुसरा आढळणार नाहीं असं ते नेहमीं म्हणतात.

**भाऊ०** — दुर्दैवानं कोटी फक्त शब्दांनच मजजवळ शिल्लक राहिली आहे. बरं पण आज इकडे कुठं पायधूळ झाडलीत!

**तोटक** — वा! भाऊसाहेब, वा! आम्हीच तुमच्या पायधुळीसारखे अन् आम्ही कसली पायधूळ झाडणार! त्याचं असं आहे भाऊसाहेब— म्हणजे रागावूं नका बरं कां! जीवावर येतं बोलायचं! आपल्याला नानासाहेबांचीं दोन्ही पत्रं मिळालींच असतील.

**भाऊ०** — दुसरं पत्र कालच मिळालं.

**तोटक** — तरी नानासाहेबांना कितीदां तरी मी सांगितलं, भाऊ-साहेब आपले स्नेही, त्यांच्या बाबतींत इतका कडकपणा धरूं नका. पण माझं थोडंच ते ऐकणार! असो. आतां प्रश्न असा आहे कीं रकमेची तजवीज आपण केव्हां करूं शकतां.

**भाऊ०** — मजजवळ नगद रक्कम तर येवढी नाहीं. अन् शिवाय आतां चारच दिवसांची मुदत दिलेली आहे. तेव्हां मी वाडा विकण्यास तयार आहें!

**तोटक** — असं म्हणतां? पण तुम्हांला खरं सांगू? आपल्या बाळ-मित्राचा वाडा विकत घ्यावा अशी कांहीं नानासाहेबांची मनापासून इच्छा नाहीं. व्यवहारामुळं त्यांना असा कडकपणा करावा लागला! बाकी तुमचा वाडा विकत घ्यावा असं त्यांना मनापासून वाटत नाहीं. त्यांनींच तर मला हें सांगितलं अगदीं खाजगी गप्पागोष्टी करतांना!

**भाऊ०**—मग नानासाहेबांनीं इतकं कडक पत्र आणि इतकी अगदीं थोडी मुदत दिली कशाला ?

**तोटक**—ह्यः ह्यः, भाऊसाहेब तुम्हीं अगदीं सरळ गृहस्थ बुवा ! आतां मी तुम्हांला अशी एक युक्ति सांगतों कीं तीमुळें तुम्हांला रक्कमहि द्यावी लागणार नाहीं आणि वाडाहि विकला जाणार नाहीं.

**भाऊ०**—काय म्हणतां ! अशी कोणती ती युक्ति आहे बरं !

**तोटक**—सांगूं ? रागावणार तर नाहीं ना आपण ! पहा बुवा ! मी काय, सांगितल्या कामाचा धनी ! पाहिजे तर अगोदर पाय धरतों, पण आम्हां गरिबांवर रागावूं नका म्हणजे झालं. (भाऊसाहेबांचे पाय धरतो.)

**भाऊ०**—(त्यास उठवून) छः छेः हें काय भलतंच ! तोटक-साहेब तुमच्यावर रागावण्याचं हो काय कारण ? तुम्हांला खुल्या दिलानं काय सांगायचं आहे तें सांगा.

**तोटक**—कसं बोललांत भाऊसाहेब ! आम्ही म्हणजे काय अगदीं ओझ्याचीं गाढवं ! कचेरींत कामाचा भार आणि घरीं संसाराचा भार ! वाहतों आहोंत ओझीं ! मग साखर भरा नाहीं तर उकिरडा भरा ! बोलतोंच तर मी आतां. पण मनाला धास्ती वाटते. अहो, तुम्हां मोठ्यांच्या भानगडींत आमचा विनाकारण चुराडा व्हायचा ! ठीक आहे, जरा कान करा इकडे भाऊसाहेब. नानासाहेबांची अशी इच्छा आहे कीं— (कानांत सांगतो.)

**भाऊ०**—(एकदम रागानें) काय म्हणतां ! पुनः बोला तोटक साहेब ! हीच तुमची युक्ति वाटतं ! माझी मुलगी, मी नानासाहेबांना

देऊं? हें कदापि शक्य नाहीं. त्यापेक्षां माझा वाडा गेला तरी चालेल! नानासाहेबांना या वयांत हे चांगलेच ढंग सुचताहेत!

**तोटक**—शांत व्हा! भाऊसाहेब, असे रागावूं नका. अहो, नानासाहेबांचं तसं म्हटलं तर अजून लग्नाचंच वय आहे! अहो विलायतेंत तर म्हणे पुरुषांचीं साठाव्या वर्षीं सुद्धां लग्नं होतात!

**भाऊ०**—पण नानासाहेब विलायतेंत नाहींत व माझी मुलगीहि हिंदुस्थानांतच जन्माला आलेली आहे.

**तोटक**—गोष्ट अगदीं खरी! पण माझं जरा ऐकून तर घ्या. नानासाहेबांचं वय फार झालं तर चाळीस! खरं म्हणजे अडतीसच! त्यांचा जन्मसन पत्रिकेंत दिला आहे १९०६ आणि शके दिला आहे १८२६; म्हणजे इसवी सनाप्रमाणें ते ३८ वर्षांचे आणि शालिवाहन शकाप्रमाणें ते चाळीस वर्षांचे आहेत. पण इतकं कशाला! मी म्हणतों कीं ते चाळीसच वर्षांचे आहेत. पण दिसायला दिसतात कीं अगदीं पंचविशीच्या तरुण बांडासारखे! जसा कांहीं, कोणी न वापरलेला अगदीं कोरा करकरीत शेलाच! बरं, तुमच्या मुलीला आवडण्याजोगे ते फॅशनेबलहि आहेत! ते बूट घालतात, विजार नेसतात, केस ठेवतात व मिशा काढतात! त्यांची राहणी सुद्धां सरदारी व फॅशनेबल आहे. त्यांच्याकडे ग्रामोफोन आहे, रेडिओ आहे, विजेचे दिवे आहेत, पंखे आहेत, भरपूर फर्निचरहि आहे! त्यांची विद्वत्ता सुद्धां कमी नाहीं. ते मॅट्रिकपर्यंतच शिकलेले असले तरी पुस्तकांनीं भरलेलीं कपाटं त्यांच्या-कडे कांहीं कमी नाहींत.

**भाऊ०**—तोटक, केवळ पुस्तकांच्या कपाटांनीं जर विद्वत्ता अजमावतां आली असती तर प्रत्यक्ष त्या कपाटांचाच विद्वान म्हणून गौरव झाला असता. शिवाय, कोठच्याहि मुलीला आपल्या नवऱ्याशीं लग्न लावायचं असतं; त्याच्याकडे असणाऱ्या ग्रामोफोनशीं, रेडिओशीं किंवा फर्निचरशीं नव्हे. वयांत आलेली मुलगी, तारुण्याला-पौरुषाला चहात असते. ओसरलेल्या तारुण्याचा केवळ आभास उत्पन्न करणाऱ्या ऐटबाज कपड्यांकडे व नाजूक नखरेलपणाकडे तिचें लक्षहि जात नाहीं. तोटक! तुम्ही कधीं तरी तरुण होतां कां हो?

**तोटक**—आं! म्हणजे! मी तरुणच आहे कीं! मला म्हातारा समजूं नका बरं! माझंहि वय चाळीसच्या आसपासच! हें पहा आज पांच वर्षं मी नानासाहेबांना माझं वय चाळीसच सांगत आलों आहे! नोकरी टिकविण्यासाठीं, मी वय कमी सांगतों व मुलं नेहमीं जास्त सांगतों!

**भाऊ०**—अस्सं! फारच धोरणी आहांत तुम्ही! तें कसंहि असो. माझी मुलगी नानासाहेबांच्या इच्छेला अनुकूल होईल कीं नाहीं याची मला जबरदस्त शंका आहे.

**तोटक**—आपणच आतां तिचं मन वळवायला हवं! शिवाय प्रसंग पाहून कदाचित् तीहि कबूल होईल. कुटुंबावर असा कांहीं प्रसंग आला कीं प्रत्येकाला स्वार्थत्याग करावा लागतोच.

**भाऊ०**—हा स्वार्थत्याग नसून माझ्या मुलीच्या आकांक्षांची जिवंत समाधि आहे. तिच्यापाशीं असली गोष्ट मी कोणत्या तोंडानं बोलूं!

**तोटक**—दगडाखालीं हात सांपडला खरा, तो काढून घ्यायला अंत:करणहि दगडासारखं करायला हवं! हो, पण बरी आठवण झाली. तुमची मुलगी कुठं दिसत नाहीं ती! बोलवा ना जरा तिला!

**भाऊ०**—तोटक, तुम्ही शुद्धीवर आहां ना! तुम्ही कांहीं माझ्या मुलीला पहायला आलां नाहीं!

**तोटक**—अहो तसं नव्हे! तुमची मुलगी ती मलाहि मुली-सारखीच! असती तर सहज पाहिली असती.

(इतक्यांत पलीकडच्या खोलींत बसलेली चंद्रिका एकदम पुढें येते व तोटकास नमस्कार करते. भाऊसाहेब व गिरिजाबाई आश्चर्यानें पाहतात. ती त्यांस कांहीं बोलूं नका असें मुद्राविक्षेपानें सुचविते).

**तोटक**—ही आपली मुलगी वाटतं! वा! फार छान वळण आहे. तुमच्या मंडळीचं कांहीं आमच्याकडे जाणंयेणं शक्यच नाहीं म्हणा. शिवाय या असतील मुंबईला शिकायला. लहानपणीं पाहिल्यासारखं आठवतं पण कांहींचा चेहरा मोठेपणीं पार बदलून जातो. जाऊं द्या यांना आंत. फारच छान वळण लावलं आहे बुवा!

(चंद्रिका पुन: पलीकडच्या खोलींत जाते.)

**भाऊ०**—तोटक साहेब, तुमच्याकडून ज्या प्रकारची सूचना आली आहे तशी ती येईल अशी मला कल्पनाहि नव्हती. शिवाय अजून तीन दिवसांचा अवधि आहे. मला तोंपर्यंत या बाबतींत विचार केला पाहिजे.

**तोटक**—अवश्य! अवश्य! जन्माच्या गांठी या! या बाबतींत जरूर विचार केला पाहिजे. बरं, येऊं मी आतां? झालेला वृत्तांत मी

नानासाहेबांच्या कानावर घालतों. पण हें पहा, माझ्यावर रागावूं नका. नानासाहेब व आपण दोन्ही मला सारखेच. आपला उपमर्द करावा असं मला स्वप्नांत सुद्धां वाटणार नाहीं. पण करायचं कसं? नोकरी करतांना, मनांत नसलं तरी कांहीं गोष्टी कराव्या लागतात. बरं येतों मी आतां! (जातो.)

( गिरिजाबाई व चंद्रिका अलीकडच्या खोलींत येतात. )

**गिरिजा०**—काय पण मेल्यानं टकळी चालवली होती! अन् चंद्रिके, तूं कशाला पुढें झालीस बाई! तो तुला नलिनी म्हणूनच समजला असेल ना! हें पहा, मी साफ सांगत्यें कीं मी कांहीं नलिनीचें त्या नानासाहेबांशीं लग्न होऊं देणार नाहीं. तुम्ही मघाशीं माझे दागिने मागत होतां ना! मी द्यायला तयार आहें! माझ्या पोरीच्यापुढें दागिने कांहीं जास्त नाहींत! काय बाई तरी अरिष्ट हें! मला तर कांहीं सुचत नाहीं. मी जात्यें आतां देवळांत. ( जाते.)

**भाऊ०**—चंद्रिके! हें तूं काय केलंस! मी न बोलवतांच तूं पुढें कशाला आलीस?

**चंद्रिका**—मामा, रागावूं नका असे. ज्या मामांनीं मला लहानपणापासून स्वतःच्या मुलीसारखी वाढविली, त्यांच्यावर असा प्रसंग आला असतांना त्या प्रसंगाचा थोडा तरी भार मी सहन करायला नको का? वाडा विकला जाणें, मामींचे सर्व दागिने जाणें, किंवा नलिनीचं जन्माचं नुकसान होणें, या तीनहि गोष्टी होण्यापेक्षां, मींच नानासाहेबांशीं लग्न लावलेलं काय वाईट?

**भाऊ०**—चंद्रिके, हें बलिदान आहे.

**चंद्रिका** — मला वाटतं कीं बलिदानाची ही नुसती कल्पनाच आहे.

**भाऊ०** — तुझ्यासारख्या शिकलेल्या मुलीनं नानासाहेबांसारख्या अशिक्षित गृहस्थाबरोबर लग्न लावणं मला तरी पसंत नाहीं. शिवाय तुझं अशा रीतीनं नुकसान करण्याचा मला हक्क नाहीं.

**चंद्रिका** — परंतु मलाहि नलिनीचं नुकसान होऊं देणं इष्ट नाहीं. आतां मामी काय म्हणाल्या तें ऐकलंत ना! मामींनीं सुद्धां मला आपल्या मुलीसारखी वागविली. निदान त्यांच्यासाठीं तरी मला——

**भाऊ०** — चंद्रिके, नानासाहेबांना खरा प्रकार कळला तर काय होईल?

**चंद्रिका** — खोट्याच्या कपाळीं गोटा कसा बसतो तें त्यांना दिसून येईल.

**भाऊ०** — छे: छे:! हें भलतंच कांहीं तरी होऊं पहात आहे. चंद्रिके, वाडा विकला गेला तरी हरकत नाहीं; परंतु तुझं काय किंवा नलिनीचं काय, नानासाहेबांशीं लग्न होतां कामा नये. पण, काय ग, नलिनी अजून आली नाहीं? ती नदीवर जाऊन बराच वेळ झाला. अरे, पण हें काय! मोटारीचा आवाज ऐकूं येत आहे. कोणाची मोटार थांबली बरं?

(उभयतां गॅलरींत जाऊन पाहतात. तों एक पंचविशीचा तरुण नलिनीला दोन्ही हातांवर झेलीत वर घेऊन येत आहे असें त्यांस दिसतें.)

**चंद्रिका** — अगबाई, हें काय अरिष्ट! नलिनी बेशुद्ध! आणि हे कोण?

**भाऊ०** — चंद्रिके, थांब गडबड करूं नको. पहिल्यानं कोणाला तरी डॉक्टरकडे पाठीव. (चंद्रिका जाते व थोड्या वेळाने परत येते.)

(तो तरुण—मंदार—नलिनीला वर घेऊन येतो आणि भाऊसाहेबांच्या खोलींत शिरून तेथें असलेल्या एका पलंगावर तिला ठेवतो.)

**मंदार** — आधीं डॉक्टरकडे बोलावणं पाठवा. मग मी आपल्याला सर्व हकीकत सांगतों.

**भाऊ०** — डॉक्टरकडे मनुष्य गेलाच आहे. पण हा प्रकार आहे तरी काय! माझा तर कांहींच तर्क चालत नाहीं.

**मंदार** — मी आपल्याला सर्व सांगतों. माझं नांव मंदार. मी मुंबईहून येथें निवांतपणें चार दिवस घालवावे म्हणून आलों. आज सकाळीं मी नदीवर पोहायला गेलों होतों. माझ्यापुढें कांहीं अंतरावर या पोहत होत्या. पोहण्याच्या नादांत या बरेच पुढें गेल्या आणि मग थकल्या. एक हात पुढें मारतां येईना कीं मागें येतां येईना अशी त्यांची स्थिति झाली. तेव्हां मी झपाट्यानें पुढें जाऊन त्यांना गाठलें आणि त्यांच्यासह हळूहळू नदीच्या किनाऱ्यावर आलों आणि माझ्या मोटारींतून त्यांना घेऊन येथें आलों. आतां डॉक्टर लवकर येतील तर बरं होईल.

**भाऊ०** — डॉक्टर आलेच असं वाटतं.

(एक बुटका मनुष्य, टक्कल पडलेला, आपल्या बॅगनिशीं प्रवेश करतो.)

**डॉक्टर** — नमस्कार भाऊसाहेब, नलिनीला पोहतांना ॲक्सिडेंट झाला वाटतं? घाबरण्याचं कारण नाहीं म्हणा. (नलिनीला तपासतो.) विशेष घाबरण्याचें कारण नाहीं. Heart ला जबरदस्त shock बसला आहे. आतांच्या आतां एक इंजेक्शन देतों.

**भाऊ०** — इंजेक्शननं लवकर आराम वाटेल म्हणतां?

**डॉक्टर** — इंजेक्शनचं कामच हें कीं पेशंटला ताबडतोब relief वाटला पाहिजे. अहो, जुनीं औषधं आतां संपुष्टांत आलींच असं समजा. आतां प्रत्येक रोगावर injection आहे. (नलिनीला इंजेक्शन देतो.) आतां दोन तासांच्या आंत या शुद्धीवर येतील. काळजी करूं नका. अच्छा, नमस्कार भाऊसाहेब. (जातो.)

(गिरिजाबाई प्रवेश करतात.)

**गिरिजा०**— मी आतांच देवळांतून परत आल्यें, तों धर्माजीनें वाटेंतच मला सर्व हकीकत सांगितली! काय करावं तरी या मुलीला? भारीच हट्टी आणि अचपळ!

**भाऊ०** — स्वत:च्या मुलीला नांवं ठेवतांना या पाहुण्यांकडे दुर्लक्ष केलंस तर तेहि तुला नांवं ठेवतील. यांचं नांव मंदार. यांनींच नलिनीला वाचविली. हे मुंबईचे एक श्रीमंत गृहस्थ आहेत.

**गिरिजा०** — खरंच कां!

**मंदार** — छे: छे:! मी श्रीमंत वगैरे कांहीं नाहीं. माझं शिक्षण नुकतंच पूर्ण झालं आहे. आतां कांहीं उद्योग सुरू करण्यापूर्वी चार दिवस मजेनं घालवावे म्हणून माझ्या एका स्नेह्याची मोटार घेऊन मी येथें आलों.

**भाऊ०** — तुमचा स्नेही फारच उदारमनस्क असला पाहिजे. असो. तुम्ही श्रीमंत असा अथवा गरीब असा; माझ्या मुलीचा संरक्षक याच नात्यानं मी तुमच्याकडे पहातों. आतां चार दिवस रहायचं तर इथंच रहा म्हणजे झालं.

**गिरिजा०**—(स्वगत) हो तर, घरचं झालं थोडं आणि व्याह्यानं धाडलं घोडं (उघड) मी पण असंच म्हणत्यें. आल्यासारखं इथंच रहावं आतां चार दिवस यानीं.

**मंदार**—मला ही सूचना मान्य करतां येत नाहीं.

**भाऊ०**—कां बरं ?

**मंदार**—आजपर्यंत मी दुसरीकडे पाहुणचार असा घेतला नाहीं. आतां इथं उतरलों तर इथल्या त्या जमदग्नि हॉटेलांत. आपल्यासाठीं दुसऱ्याला उपसर्ग देणं मला पसंत नाहीं.

**गिरिजा०**—(स्वगत) मानभावीच दिसतो. मनांतून तर रहायचंय् पण उगाचच 'अग अग म्हशी न् मला कां ग नेशी !' (उघड) त्यांत कसला आलाय् उपसर्ग ! आमच्याकडे नेहमींच पाहुणे असतात.

**भाऊ०**—मंदार, आपण सर्वच या जगांत चार दिवसांचे पाहुणे आहोंत. धर्मशाळेंत उतरणाऱ्या एका वाटसरूनं दुसऱ्या वाटसरूची कांहीं काळ सोय पाहिली तर बिघडलं कुठं ? मग आतां राहणार ना तुम्ही ?

**मंदार**—आपला कोटिक्रम अगदीं बिनतोड आहे.

**भाऊ०**—झालं तर मग ! धर्माजी, (एक नोकर येतो) पाहुण्यांना त्यांची खोली दाखीव. चंद्रिके, मंदारांच्या चहाची व फराळाची व्यवस्था तावडतोब करीव बरं.

(मंदार, चंद्रिका व नोकर जातात.)

**गिरिजा०**—मघांशी बोलतांना मी एक विचारायचं विसरल्येंच.

**भाऊ०**—आश्चर्यच म्हणायचं !

**गिरिजा०**—नलिनीला पहायला येण्यासाठीं मुंबईचे कोणी गृहस्थ येणार होते त्यांचं कांहीं पत्र आलं कां?

**भाऊ०**—अजून तर कांहीं आलं नाहीं, पण एक दोन दिवसांत यावं असं वाटतं. तो गृहस्थ आतां उशीरा आला तर बरंच होईल. नलिनी तर अशी बेशुद्ध!

(इतक्यांत 'भाऊसाहेब आहेत कां' असा खालून पुकारा ऐकूं येतो; गिरिजाबाई पाहतात. एक तारवाला येतो).

**तारवाला**—भाऊसाहेब ही घ्या आपली तार!

**गिरिजा०**—अगबाई! कोणाची तार! जळ्ळं मेलं! आमच्या लोकांना फारच वाईट खोड लागली आहे. कांहीं चांगलं झालं असलं तर कध्धीं मेले तारा करायच्या नाहींत!

**भाऊ०**—(हंसून) कां उगाच शिव्या! हें पहा, नलिनीला पहायला येणारे गृहस्थ आज संध्याकाळच्या गाडीनं इकडे येत आहेत असं या तारेंत आहे. सकाळपासून आश्चर्यांची परंपरा लागली आहे यांत शंका नाहीं.

**गिरिजा०**—अगबाई! आजच का येणार ते गृहस्थ? बरं बाई! त्यांची नीट व्यवस्था मलाच केली पाहिजे.

**भाऊ०**—अगदीं चांगली व्यवस्था कर. मलाहि नानासाहेबांच्या सूचनेची कांहीं व्यवस्था पाहिली पाहिजे.

**गिरिजा०**—एकेक त्रासच आहे मेला. नलिनी अजून शुद्धीवर आली नाहीं! एखादा दिवस असा चमत्कारिक येतो—

**भाऊ०**—पण तो आतां जात चालला आहे.

(दोघे जातात; पडदा.)

**अंक १ ला समाप्त.**



## अंक २ रा.

(**स्थळ**—भाऊसाहेब जहागिरदारांच्या वाड्याच्या पिछाडीची बाग. बागेंत नानाप्रकारचीं फुलझाडें असून मोठमोठे वृक्ष, लताकुंज कारंजीं वगैरे आहेत. एका मोठ्या वृक्षाजवळ एक मोठा दगड. चंद्रिका प्रवेश करते. ती त्या दगडावर बसते. तोंडानें ती एक गाणें गुणगुणत आहे.)

**चंद्रिका**—जरि आला हा असुखद वर्षाकाल
चिरकाल कसा राहील?
जरि आटपला वसंत-विभव-पसारा
कोसळती दुर्दिन-धारा
हे सारवती कृष्ण मेघ गगनाला
कृष्णताच देति तयाला
हें चक्रचि सुखदुःखाचें
विभवाचें दारिद्र्याचें
तें फिरतें अविरत साचें
हे सृष्टिसती उदास कां तूं होशी
भेटेल वसंतचि तुजशी!

(गाणें थांबवून) काल ते गृहस्थ आले आणि किती चमत्कारिक परिस्थिति निर्माण झाली! नलिनी बिचारी तापानें बेशुद्ध! अशा स्थितींत ते गृहस्थ तिला काय पाहणार? आतां त्यांनीं दोन तीन दिवस थांबण्याचें कबूल केलं आहे म्हणा. चार पाहुणे मंडळींत कांहीं दिवस गमतीनं जातील हें मात्र खरं! नलिनीसारख्या स्वतंत्रवृत्तीच्या आणि हट्टी स्वभावाच्या मुलीला अनिरुद्ध कितपत मनास येतील कोण जाणे! ते जरा उथळ आणि छचोर वाटतात. मंदारांच्याच वयाचे आहेत ते. पण

मंदारांच्या स्वभावांत निगर्वीपणा, गांभीर्य व विनोदप्रियता यांचं मोठं मनोहर मिश्रण झालं आहे. मंदारांची एकंदर चालचलणूक ते खानदानी घराण्यांतले असावेत असं सुचवते. मग त्यांच्याजवळ हल्लीं संपत्ति असो वा नसो. परंतु अनिरुद्ध जरी श्रीमंत असले तरी त्यांची वागणूक उठवळासारखीच वाटते. हं! पण मला करायचंय् काय असले विचार करून! आज चोहींकडे असं उदास कां वाटतं कोण जाणे! काय मनाचा धर्म आहे पहा! माझं मन उदास म्हणून मला सारी सृष्टि उदास वाटूं लागली आहे! मंदार! खरोखरच मंदार जर माझे....पण हें कसं व्हायचं! मी आतां भाऊसाहेबांची मुलगी नलिनी झाल्यें आहे ना! छे, नलिनीच्या व भाऊसाहेबांच्या सुखासाठीं मला हा विचार दूर केलाच पाहिजे. दूर केला पाहिजे....हं! असं दूर हो म्हटल्यानं विचार थोडेच दूर होत असतात! अगबाई! पण हें काय! अनिरुद्ध व मंदार इकडेच येत आहेत. आपण आतां कोठेंतरी आड व्हावं हें बरं.

(चंद्रिका एका जाळीच्या आड जाते. अनिरुद्ध व मंदार बोलत येतात. अनिरुद्धाच्या तोंडांत सिगारेट.)

**अनिरुद्ध** — मंदार! तुम्ही इतके दिवस मुंबईत राहत असून तुम्हांला सिगारेटचं व्यसन नसावं म्हणजे आश्चर्यच आहे. जो सिगारेट ओढीत नाहीं तो मुंबईकरच नव्हे!

**मंदार** — तुमच्या या व्याख्येमुळें बिचाऱ्या मुंबईतल्या बायकांवर अनवस्थाप्रसंग ओढवून त्यांचं मुंबईचं नागरिकत्व रद्द करावं लागेल!

**अनिरुद्ध** — वा वा! कमाल आहे बुवा तुमच्या बोलण्याची! आम्हांला हें असलं सुचतच नाहीं! तुमचा अनुसंग कीं व्यासंग—हं—व्यासंगच—फारच समर्पक असला पाहिजे.

**मंदार** — समर्पक! दांडगा किंवा जबरा असं म्हणायचं असेल तुम्हांला!

**अनिरुद्ध** — तच तें! एकच तें सारं! आमची बुवा कांहीं मराठी भाषेवर कमांड नाहीं. असं पहा, आमचा व्यवहार चालतो इंग्रजींत किंवा गुजराथींत. तेव्हां—

**मंदार** — चुकूनच तुम्हीं महाराष्ट्रीय घराण्यांत जन्माला आलेत म्हणायचं! पण तें असो म्हणा! काल तुमची फार निराशा झाली असेल नाहीं?

**अनिरुद्ध** — कां बुवा?

**मंदार** — तुम्ही काल नलिनीला पहायला म्हणून आलेत अन् ती तर बेशुद्ध होती; म्हणून म्हणतों.

**अनिरुद्ध** — निराश वगैरे कांहीं झालों नाहीं म्हणा! उलट नलिनीला पोहायला येत आहे हें ऐकून मला फार आनंद झाला. अहो, आजकाल बायकांना सगळं कांहीं करतां आलं पाहिजे. पोहायला येणं, सायकलवर बसणं, लाठी फिरविणं, सिनेमाला जाणं या सगळ्यांत प्रत्येक मुलगी तरबेज असली पाहिजे.

**मंदार** — मला वाटतं मुलींना एकच गोष्ट करतां आली तरी पुरे आहे.

**अनिरुद्ध** — आं! ती काय बुवा?

**मंदार** — आपला नवरा आपल्या मुठींत ठेवणं!

**अनिरुद्ध** — वा! अगदीं सोळा आणे बोललांत. पण हें पहा मंदार, हल्लीं जरा उलट प्रकार सुरू झाला आहे.

**मंदार**— तो काय! सांगा वरं.

**अनिरुद्ध**— आपला नवरा मुठींत ठेवण्याऐवजीं दुसरीचाच नवरा मुठींत ठेवण्याचा कांहीं मुली उपद्व्याप करतात!

**मंदार**— जाऊं द्या तें! अजून कांहीं नलिनीला तुम्ही व्यवहारोक्त पद्धतीनं पाहिलं नाहीं!

**अनिरुद्ध**— तसं पाहिलं म्हणा! पण तें पाहणं कांहीं खरं नाहीं.

**मंदार**— लग्नाची मुलगी कशी असावी असं तुम्हांला वाटतं?

**अनिरुद्ध**— ती लग्न करायला राजीखुशीनं तयार असली पाहिजे असं वाटतं!

**मंदार**— छान! पण मी तें नाहीं विचारीत तुम्हांला. तुमची अभिरुचि कशी काय आहे या बाबतींत?

**अनिरुद्ध**— तुमचा प्रश्न जरासा चमत्कारिकच आहे. हें पहा, लग्नाची मुलगी अगदीं सुंदर असली पाहिजे.

**मंदार**— पण सुंदर म्हणजे काय? रूपानं कीं गुणानं!

**अनिरुद्ध**— हें पहा मंदार, हें गुणसौंदर्याचं फॅड कुरूप मुलींच्या बापांनीं व कुरूप बायकांच्या नवऱ्यांनीं उगाचच उठविलेलं आहे. मुलगी गुणांनीं चांगली आहे असं म्हणायचं म्हणजे उगाच आपलं कांहीं तरी समाधान मानून घ्यायचं झालं. लग्नाची मुलगी सुंदरच पाहिजे.

**मंदार**— बरोबर आहे तुमचं म्हणणं. गुण वाईट असले तर मागाहून दुरुस्त करतां येतात तसं रूप कांहीं मागाहून दुरुस्त करतां येत नाहीं. नाकच नकटं असलं तर मागाहून थोडीच त्याला पुरवणी जोडतां येतं! नलिनी सुंदर आहे कीं नाहीं?

**अनिरुद्ध**—सुंदर! सुंदर आहे म्हणा! पण ती आतां आजारीच असल्यामुळें नीटसं सांगतां येणार नाहीं. येवढं खरं कीं तिच्यांत सेक्स अपील कमी असावं.

**मंदार**—सेक्स अपील? अस्सं! हीं काय भानगड आहे?

**अनिरुद्ध**—सॉरी मंदार, तुम्ही आधुनिक कामशास्त्र वाचीत नाहीं असं दिसतं. पाश्चात्यांनीं काम या विषयाचं स्वतंत्र शास्त्रच बनवलं आहे! आहांत कुठें?

**मंदार**—आहे इथेंच म्हणा! एक गोष्ट खरी कीं आम्ही पौर्वात्य लोक शास्त्रकामी असून पाश्चात्य लोक नुसतेच कामशास्त्री दिसतात! पण सेक्स अपील म्हणजे तुम्ही काय समजतां तें तर सांगा!

**अनिरुद्ध**—थोडक्यांत सांगतों. जी स्त्री किंवा मुलगी पाहिल्या-बरोबरच आकर्षक वाटून आपल्या सर्व भावना उचंबळून येतात आणि असं वाटतं कीं—छे, नाहीं बुवा सांगता येत! खरं सांगू, सेक्स अपील हें 'फील'च व्हावं लागतं!

**मंदार**—असं म्हणतां! पण ही तर नुसती विकारवशता दिसते.

**अनिरुद्ध**—विकारवशता कसली आली आहे हो! हा खरा मर्दपणा आहे!

( इतक्यांत 'साप, साप, धांवा कुणी तरी लवकर धांवा' असें चंद्रिका बाहेर ओरडत येते. मंदार जाळीच्या अनुरोधानें हातांतली जाड काठी घेऊन धावूं लागतो. अनिरुद्ध 'मंदार तुम्ही व्हा पुढें, मी पण येतोंच काठी घेऊन' असें म्हणत तेथून जातो. मंदार जाळीच्या अनुरोधानें धावून सापाजवळ पोंचून हातांतल्या काठीनें सापास मारतो. चंद्रिका–मुद्रा घाबरलेली, घाम आलेला–अशी त्याच्याकडे कृतज्ञतेनें पाहते. )

**मंदार** — तुम्हांला दंश तर नाहीं ना झाला ?

**चंद्रिका** — नाहीं. साप मला दिसल्याबरोबरच मी ओरड केली.

(भाऊसाहेब, गिरिजाबाई, एक दोन नोकर माणसें येतात.)

**भाऊ०** — साप साप म्हणून तूंच ओरडलीस का चांद्रिके ! वा ! मंदार आम्ही यायच्या आंत तुम्ही त्याचा निकालहि लावून टाकलेला दिसतो.

(अनिरुद्ध प्रवेश करतो.)

**अनिरुद्ध** — अरेरे ! मी येवढी काठी आणली त्याचा कांहींच उपयोग नाहीं म्हणायचा !

**मंदार** — आतां दुसरा साप उत्पन्न होईपर्यंत वाट पाहात बसणं इतकंच काम त्या काठीला करावं लागेल !

**भाऊ०** — मंदार, उपकारानं आम्हांला ऋणी करून ठेवायचा तुमचा निश्चयच झाल्यासारखा दिसतो. कालच तुम्ही नलिनीला वांचविलींत, आज चंद्रिकेचं सर्पदंशापासून रक्षण केलंत. तुमचं उतराई होणं आम्हांला कठीण झालं आहे. अरे, पण चंद्रिका इतक्यांत कोठं गेली ?

**मंदार** — त्या कांहींशा घाबरल्या होत्या. बरं वाटावं म्हणून आंत गेल्या असतील.

**गिरिजा०** — मला वाटतं आपणहि आतां आंत जावं.

**भाऊ०** — चला तर. मंदार, तुम्ही बागेंतच हिंडतां वाटतं. अनिरुद्ध आहेतच तुमच्या सोबतीला.

**अनिरुद्ध** — तसं नाहीं भाऊसाहेब. मंदारांना एकट्यांनाच बसूं द्या येथें. मी पण तुमच्याबरोबर घरांतच येतों. मला मुंबईला कांहीं महत्वाचीं पत्रं लिहून रवाना करायचीं आहेत.

**भाऊ०**— बरं तर मंदार. जातों आम्ही. (जातात.)

(मंदार एकटाच बागेंत हिंडतो.)

**मंदार**— काय योगायोग आहे! नवीनच मिळालेल्या प्रोफेसरीच्या जागेवर रुजू होण्यापूर्वी कोठें तरी चार दिवस मजेंत घालवावे म्हणून येथें आलों तों या भाऊसाहेबांचाच पाहुणा झालों! आणि आल्यापासून या चंद्रिकेच्याचबद्दल विचार मनांत घोळत असतात. नलिनी आणि चंद्रिका! पण चंद्रिकेचें मार्दव, तिच्या मुद्रेची शांत रमणीयता आणि तिचें मर्यादशील वर्तन हीं कांहीं विशेषच आहेत. त्या दोघी कांहीं बहिणी बहिणी दिसत नाहींत. दोघींच्याहि तोंडवळ्यांत बराच फरक आहे. मग चंद्रिका ही भाऊसाहेबांची कोणी दूरची नातेवाईक तर नाहीं? कोणी कां असेना! पण उपजत बुद्धि म्हणून म्हणा किंवा मनाची ओढ म्हणून म्हणा, चंद्रिका ही सहधर्मचारिणी होईल तर बरं होईल असं मला वाटायला लागलं आहे. पण हें व्हायचं कसं! भाऊसाहेब अलीकडे सचिंत दिसतात. कांहीं तरी पैशाची अडचण असावी असं वाटतं. या सगळ्या गोष्टींचा खुलासा चंद्रिकेशिवाय होणें कठीण. मघां ती घाबरल्यामुळें आंत गेली. आतां जर पुनः आली तर काय बहार होईल? (दूर पाहून) अरे पण ही कोण इकडे येत आहे? आणि इतकीं सावकाश पावलं टाकीत! अगदीं रघुनाथ पंडितानं म्हटल्याप्रमाणं 'हे मंदमंदपद सुंदर कुंददंती' पैकींच प्रकार दिसतो. चंद्रिकाच नाहीं ना?

(नलिनी हलके हलके पावलें टाकीत प्रवेश करते. मंदारास पाहून एकदम 'अगबाई' म्हणून थबकते.)

**मंदार**—तुम्ही घाबरण्याचं कारण नाहीं. तुम्ही या ठिकाणीं याल अशी माझी कल्पना नव्हती.

**नलिनी**—आणि माझ्याशीं बोलणारे तुम्ही अपरिचित गृहस्थ कोण याचीहि मला कल्पना होत नाहीं.

**मंदार**—तसं पाहिलं तर तुमचा व माझा परिचय यापूर्वीच झालेला आहे. पण त्यावेळीं माझा परिचय करून घेण्याच्या स्थितींत तुम्ही नव्हतां.

**नलिनी**—म्हणजे काय! मला हें संदिग्ध भाषण नाहीं समजत. माझं डोकं अगदीं सुन्न होऊन गेलं आहे. तुम्हांला कोठं तरी पाहिल्या-सारखं वाटतं पण आठवत नाहा.

**मंदार**—कालचीच गोष्ट आहे. तुम्ही येथल्या नदीवर पोहायला गेलां होता. कांहीं वेळ आणि बरेंच अंतर पोहून गेल्यावर तुम्ही थकल्या-मुळें म्हणा किंवा अन्य कारणामुळें म्हणा बुचकळ्या खायला लागलां. त्याप्रसंगीं मी तुम्हांला सहाय्य करून, सुरक्षितपणें घरीं आणून पोंचवलं. तुम्हांला हें कसं ठाऊक असणार? कारण तुम्हीं बेशुद्ध होतां.

**नलिनी**—काय? काय? तुम्ही मला वाचवलंत? तुमचं नांव अनिरुद्ध तर?

**मंदार**—मी अनिरुद्ध? तुमचा कांहीं तरी गैरसमज झालेला दिसतो. माझं नांव मंदार.

**नलिनी**—मला बरोबर आठवत नाहीं. पण काल सायंकाळीं मी जेव्हां शुद्धीवर आल्यें तेव्हां एक गृहस्थ माझ्या कॉटजवळ खुर्चीवर

बसून मला वाचविल्याची हकीकत सांगत होता. त्याची मुद्रा मला नीटशी आठवत नाहीं. मग मला खरोखर कुणी वाचवलं ?

**मंदार**—ईश्वरानं. गोंधळांत पडूं नका. मी सर्व उलगडा करतों. अनिरुद्ध नांवाचे गृहस्थ तुम्हांला पहायला आले आहेत. त्यांनीं तुम्हांला नदींतून तारलं नाहीं ही गोष्ट खरी, पण संसारसमुद्रांतून तुम्हांला तारण्याच्या उद्देशानें ते येथें आले आहेत.

**नलिनी**—अस्सं ! माझ्या लग्नाची बाबांना फार उतावीळ झालेली दिसते. पण मी अशी जबरदस्तीनं कुणाच्याच गळ्यांत माळ घालणार नाहीं. एकूण अनिरुद्धांनीं माझ्याशीं वंचना केली तर !

**मंदार**—मनुष्यस्वभाव आहे हा ! पण तुम्ही इतका वेळ बाहेर राहतां हें बरं नाहीं. तुम्हांलाच त्रास होईल.

**नलिनी**—किती वेळ अंथरुणावर पडून राहूं ! चंद्रिका आतां बाहेर गेली म्हणून मी उठल्यें. तिनं कांहीं मला उठूं दिलं नसतं. ती जर आली तर मला मुकाट्यानं आंत गेलंच पाहिजे. पण अजून तुम्ही स्वतःची हकीकत सांगितली नाहीं.

**मंदार**—मी एक अगदीं सामान्य गरीब मनुष्य आहें.

**नलिनी**—ही कांहीं तुमची हकीकत नाहीं.

**मंदार**—तुम्ही मघाचपासून उभ्या आहांत. या दगडावर बसाल, तर मी तुम्हांला माझा परिचय करून देतों.

**नलिनी**—(दगडावर बसते) हं. द्या आतां मला तुमचा परिचय करून.

**मंदार**—खरोखर माझा परिचय तुम्हांला काय करून द्यावयाचा! मी यंदाच एम्. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झालों; आणि आतां मला नुकतीच मुंबईच्या एका कॉलेजांत प्रोफेसरची नोकरी लागली आहे. नोकरीवर रुजू होण्यापूर्वी, येथें सहज, मजेंत दिवस घालवावे म्हणून आलों. पुढचं तुम्हांला माहीत आहेच. सुदैवानं तुमच्या इथं पुस्तकसंग्रह बराच आहे म्हणून माझा वेळ जातो.

**नलिनी**—इतकीच सारी तुमची हकीकत? मला वाटतं तुम्ही कांही तरी छपवून ठेवीत आहां माझ्यापासून. तुम्हांला पोहायला येतं हें कुठं तुम्ही सांगितलं?

**मंदार**—हो. हें मात्र खरं आहे. पण माझा तो गुण तुमच्या प्रत्यक्ष अनुभवालाच आला असल्यामुळं तो मी सांगितला नाहीं. पण हें पहा याच्यापुढें आतां तुम्ही पोहतांना जरूर सावधगिरी ठेवा. कारण अनिरुद्धांना—

**नलिनी**—इश्श! कांहीं तरीच आपलं बोलणं! अनिरुद्ध ते कोण, त्यांचा माझा अजून परिचय सुद्धां नाहीं.

(चंद्रिका प्रवेश करते.)

**चंद्रिका**—नलिनी, हें ग काय? तूं बाहेर कशी? अजून तुझा आजारीपणा संपलेला नाहीं. बाहेर वाऱ्यांत बसून तुझी तब्येत मात्र जास्त बिघडेल.

**नलिनी**—एकसारखं बिछान्यांत निजून मला आला कंटाळा. म्हणून आतांच जराशीं बाहेर आल्यें. मंदारांची व माझी ओळख आतांच झाली.

**मंदार**—मला वाटतं कीं मी आतां जावं. मला बागेंत येऊन बराच वेळ झाला. मी आतां फिरायला जातों. चंद्रिकाबाई, आज तुमच्या-वरचं एक अरिष्टच टळलं.

**नलिनी** — मी ओझरतं ऐकलं तें. सांग ना तूं चंद्रिके मला सगळं.

**चंद्रिका** — अग, मी याच दगडावर बसल्यें असतांना एक मोठा साप निघाला, अन् अगदीं माझ्याजवळ येऊं लागला. मी एकदम मोठ्यानं ओरडलें, तों यानींच धांवून येऊन त्या सापाला मारून टाकल.

**नलिनी** — अन् अनिरुद्ध कोठं होते त्या वेळेला?

**चंद्रिका** — कुणास ठाऊक बाई. अगबाई! पण मंदार कुठं गेले? फिरायला गेले वाटतं?

**नलिनी** — तूं त्यांची स्तुति केलीस. ती ऐकायला नको म्हणून ते असे न सांगताच निघून गेले असावेत. गृहस्थ मोठा उमदा दिसतो नाहीं चंद्रिके! हा गृहस्थ चांगला खानदानी आणि श्रीमंत असला पाहिजे.

**चंद्रिका** — हें तूं कशावरून म्हणतेस?

**नलिनी** — अग खानदानी व उपजत श्रीमंती लगेच दिसून येते, ती छपत नाहीं. त्यांचं बोलणंहि खुबीदार आहे. शिवाय त्यांचं धैर्यहि असामान्य आहे.

**चंद्रिका** — जरा थांब; शब्दकोश घेऊन येतें.

**नलिनी** — तो कशाला ग?

**चंद्रिका** — मी सारे सद्गुणवाचक शब्द एकदमच तुला काढून देतें म्हणजे मग तुला मंदारांचं गुणवर्णन करतांना फारशी अडचण पडणार नाहीं.

**नलिनी**—चल चावट कुठली! मंदारांचं गुणवर्णन तुला आवडत नाहीं वाटतं!

**चंद्रिका**—माझ्या आवडीनावडीचा प्रश्न तूर्त बाजूला आहे. पण कोणालाहि कधींहि प्रथमतः बरं न म्हणणाऱ्या एका माणसाला, ज्या अर्थी तो गृहस्थ इतका बरा वाटला त्याअर्थी लग्न न करण्याचा त्या माणसाचा निश्चय लवकरच डळमळणार असं दिसतं.

**नलिनी**—पुरेग! एकसारखा आपला वात्रटपणा काय करतेस! (हंसून मुरकते.)

**चंद्रिका**—आतां तर मला पुरतं समजलंच. नलिनी, सांग खरं सांग, लव्ह ॲट फर्स्ट साईट असा प्रकार झाला आहे ना? बाकी, ज्या गृहस्थानं तुला वाचवलं त्याची तूं अशा रीतीनें जन्मभर ऋणी राहिलीस तर त्यांत कांहीं वावगं नाहीं.

**नलिनी**—हें ग काय चंद्रिके? त्या उपकारांचा व लग्नाचा संबंध काय? तशा रीतीनं लग्न होण्यासाठीं, प्रत्येक मुलीला स्वतःला नदींत बुडवून घ्यावं लागेल.

**चंद्रिका**—तें राहूं दे. पण तुला आवडतील अशा तऱ्हेचे मंदार हे गृहस्थ आहेत असा तुझा ग्रह झालेला पाहून मला खरोखरीच फार समाधान वाटतं. मामांच्या पाठीमागची एक काळजी दूर झाली. पण आतां अनिरुद्धांचं कसं होणार? ते तर तुला पहायला आले आहेत.

**नलिनी**—मला काय पहायची आहे? मी काय प्रदर्शनांतली वस्तु आहे? त्यांचं नांव सुद्धां मला आवडत नाहीं.

**चंद्रिका** — बाई! बाई! त्यांच्याबद्दल तुला इतका तिटकारा! आणि त्याचं कारण? नलिनी, ते आपल्याकडे पाहुणे म्हणून आलेले आहेत.

**नलिनी**— हो, आणि मला पहायला म्हणून आलेले आहेत! इश्श! वास्तविक मंदारांनीं मला वाचविलं असतांना त्यांनीं "मीच तुम्हांला वाचविलं" असं मला खुशाल खोटं सांगितलं! शोभलं कां त्यांना हें?

**चंद्रिका** — अग, कांहीं माणसांचा असा बढाई मारण्याचा स्वभावच असतो. पुरुषांच्या अशा कित्येक दुर्गुणांकडे बायकांना दुर्लक्षच करावं लागतं बरं! नलिनी, तूं खरोखर भाग्यशाली आहेस. मंदारांकडे झुकणारा तुझ्या मनाचा कल पाहून मला मोठा आनंद वाटतो. पण तूं जरा स्वतंत्र वृत्तीची व तापट स्वभावाची म्हणून काळजीहि वाटते.

**नलिनी**— अहा ग! काय पण चालवलंय्स मगाचपासून? जसं कांहीं मंदारांचं व माझं लग्नच ठरलं आहे. आणि —

**चंद्रिका** — आणि म्हणून कां थांबलांत बाईसाहेब? बोला ना!

**नलिनी** — अग हें आपलं एकतर्फी मनोराज्य नाहीं कां? मंदारांना मी पसंत असल्यें पाहिजे ना?

**चंद्रिका** — राघू जितका जास्त बोलतो तितका अधिक पिंजऱ्यांत अडकतो, तशीच तुझी अवस्था होत चालली आहे. मंदारांना तूं पसंत आहेस कीं नाहींस अशी शंका ज्याअर्थी तुझ्या मनांत उत्पन्न झाली आहे त्याअर्थी तुझ्या मनानं मंदार पसंत केलेच आहेत हें मात्र निश्चित.

**नलिनी** — फार छान! आतां आपण वकीलीच्या अभ्यासाला सुरवात करा बाईसाहेब! पण चल ना आतां घरांत.

**चंद्रिका** — कंटाळलीस वाटतं! कंटाळली असलीस तर जा. मी आणखी पंधरावीस मिनिटांनीं येत्यें. मी बसतें जरा इथेंच.

**नलिनी** — कसला विचार करतेस? मला कळेलच केव्हांतरी. मी जात्यें आतां. (जाते.)

( चंद्रिका एकटीच )

**चंद्रिका** — ( सुस्कारा टाकून ) नलिनीहि मंदारांवर अनुरक्त! पण, वेड्या मना, तुला आतां या गोष्टीचा विचार करून करायचं काय? पुन: पुन: त्यांच्या अभिलाषाविषयीं विचार कां यावेत? नलिनीच्या व भाऊसाहेबांच्या सुखासाठीं मला मंदारांबद्दलचे विचार अजिबात दूर केले पाहिजेत. त्यांची मूर्ती मला दृष्टीआड केलीच पाहिजे.

( मंदार प्रवेश करतो.)

**मंदार** — संध्याकाळ होत आली, अजून तुम्ही इथेंच आहांत? मला बाहेर सुद्धां आज करमलं नाहीं, म्हणून मी लवकर परत फिरलों. म्हटलं परत जातांना बागेंतच चक्कर मारून परत जावं. खरं म्हणाल तर मी आतां येथें विनाकारण राहिलों आहे. एक दोन दिवसांत परत जाईन म्हणतों. पण जाण्यापूर्वीं तुमच्याकडून कांहीं गोष्टींचा खुलासा करून घ्यावा असा माझा विचार आहे. तुम्ही मनमोकळेपणानं माझ्या प्रश्नांचीं उत्तरं द्याल असं मला वाटतं.

**चांद्रिका** — आपण खुशाल विचारा. मला जें जें ठाऊक आहे तें तें मी सारं सांगेन.

**मंदार**—भाऊसाहेब अलीकडे कसल्या चिंतेंत असतात? तेच चिंतातुर असल्यामुळें वाड्यांत असावं तितकं प्रसन्नतेचं वातावरण नाहीं, हें तुमच्या लक्षांत आलं असेलच.

**चंद्रिका**—भाऊसाहेबांच्या उदार आणि खर्चिक स्वभावामुळं त्यांना बरंच कर्ज झालेलं होतं. हें कर्ज एकरकमी व एकाच सावकाराकडे असावं म्हणून त्यांनीं आपले बालस्नेही नानासाहेब यांजकडून ५०००० रुपये घेतले होते. नानासाहेबांनीं आतां पैशाची निकड लावली आहे. पैसे दोन दिवसांत दिलेच पाहिजेत. नानासाहेबांनीं एक पत्र महिन्यापूर्वींच पाठविलं होतं. परंतु भाऊसाहेबांनीं त्याची वाच्यता केली नाहीं.

**मंदार**—म्हणून भाऊसाहेब चिंतेंत आहेत तर. ५०००० कांहीं लहान सहान रक्कम नाहीं. आणि रकमेची फेड झाली नाहीं तर—

**चंद्रिका**—वाड्याची विक्री करून द्यावी असं नानासाहेबांनीं लिहिलं आहे.

**मंदार**—हा प्रसंग असा आहे कीं, यामुळं सर्वांचीच मनं चिंताक्रांत होणं साहजिक आहे. अशा परिस्थितींत मी जर तुम्हांला एखादा प्रश्न विचारला तर तुम्हांला राग येणार नाहीं ना?

**चंद्रिका**—आपण खुशाल विचारा.

**मंदार**—चंद्रिके! विचारणं कांहींसं उतावीळपणाचं खरंच! पण विचारतों. चंद्रिके, तूं माझी सहधर्मचारिणी होशील कां? माझ्या संसाराची देवता अशा तऱ्हेची असावी म्हणून जी एक मूर्ति हृत्पटलावर

मी कोरून ठेवली होती, ती तुझ्या रूपानें मला आज प्रत्यक्ष दिसत आहे. सांग माझी ही आकांक्षा तूं पूर्ण करशील का?

**चंद्रिका**—(एकदम गहिंवरून) मंदार! मंदार! तुम्ही म्हणतां त्याप्रमाणं मी करायला तयार असल्यें तरी मला तसं करतां येत नाहीं. तुमची सहधर्मचारिणी व्हायला मी मोकळी नाहीं. माझे हात बांधलेले आहेत.

**मंदार**—हें काय! या अश्रूंचा अर्थ काय? मी तर अगदीं गोंधळून गेलों आहे. तुझे हात कोणी आणि कसे बांधले आहेत? चंद्रिके, आपले अश्रु आवर आणि खुल्या दिलानं मला सर्व कांहीं सांग.

**चंद्रिका**—(डोळे पुसून) आपली रक्कम वसूल होईल कीं नाहीं याचा अंदाज करण्यासाठीं आणि आपली दुसरी एक इच्छा प्रकट करण्यासाठीं नानासाहेबांनीं आपला कारकून तोटक भाऊसाहेबांकडे पाठविला होता. त्यानं नानासाहेबांची इच्छा अशी प्रकट केली कीं जर भाऊसाहेबांनीं नलिनीचं लग्न नानासाहेबांशीं लावून दिलं तर ते ती रक्कम सोडावयास तयार आहेत. तोटकानं 'कुठं आहे तुमची मुलगी' असंही विचारलं. मी शेजारच्या खोलींत बसल्यें होत्यें. मी झट्दिशीं पुढं झाल्यें आणि त्याला नमस्कार केला. मीच भाऊसाहेबांची मुलगी नलिनी अशी भूमिका घेतली आहे. नानासाहेबांसारख्या वृद्ध वराशीं लग्न होऊन नलिनीचं जन्माचं नुकसान होण्यापेक्षां मीच नानासाहेबांशीं लग्न लावलेलं काय वाईट? मी भाऊसाहेबांची उपकृत आहे. लहानपणापासून अनाथ झालेल्या मला, अगदीं फारच ममतेनं वाढवून त्यांनीं लहानाची मोठी केली, शिक्षण दिलं, सर्वस्वी सुखांत ठेवली.

त्यांच्यावर असा प्रसंग आला असतां मी मागें राहून कसं चालेल ? मला माझी भूमिका नीट पार पाडलीच पाहिजे. मंदार, माझ्या या निश्चयाच्या आड तुम्ही येऊं नका. मला हें कठोर कर्तव्य केलं पाहिजे.

**मंदार**—नलिनीला हा प्रकार माहीत आहे का ?

**चंद्रिका**—नाहीं. कां बरं ?

**मंदार**—सहज विचारलं. पण भाऊसाहेबांनीं वाडा विकला तर!

**चंद्रिका**—तेंहि भाऊसाहेबांना करूं द्यायचं नाहीं असा माझा विचार आहे.

**मंदार**—तर मग मार्गच खुंटला. केवळ आतां भवितव्यतेवरच भरंवसा ठेवणं भाग आहे. चंद्रिके, तुझ्या मनानं जो योग्य असा स्वार्थ-त्याग तुला करावासा वाटतो त्यापासून तूं परावृत्त व्हावंस असं मी तुला कसं सांगू ? मला मात्र आतां इथून गेलें पाहिजे.

**चंद्रिका**—तुम्हांला जातां येणार नाहीं. नलिनीसाठीं तुम्हांला राहिलं पाहिजे.

**मंदार**—काय! नलिनीसाठीं मला राहिलं पाहिजे. तें काय म्हणून ?

**चंद्रिका**—नलिनीचं प्रेम तुमच्यावर बसूं पहात आहे. नलिनीला तुम्ही सुखी करावं अशी माझी मनापासून इच्छा आहे. ती सुखी झालेली पाहून मला अत्यंत सुख होईल.

**मंदार**—पण तुझ्याशीं विवाह करून मला जें सुख होईल तें नलिनीशीं विवाह करून होणार नाहीं. मी असुखी झालेला पाहून तुला सुख होईल का ?

**चंद्रिका**—तुमचा प्रश्न बिनतोड आहे खरा ! पण नलिनीशीं जर तुम्ही विवाहबद्ध झालांत तर माझ्या दु:खांत मला तेवढंच सुख मानतां येणार नाहीं कां !

**मंदार**—काय चमत्कारिक पेंच आहे ! चंद्रिके, रागावूं नको, पण मला नलिनीशीं लग्न करतां येणार नाहीं.

**चंद्रिका**—तिला निराश करणार तर तुम्ही ? पण ही पहा नलिनीच हळूहळूं इकडे येत आहे. ही पुन: कशाला आली बरं ?

**नलिनी** (प्रवेश करून)—चंद्रिके ! अजून तूं बागेंतच आहेस ! करते आहेस तरी काय बाई इथं ! अगबाई ! मंदार पण आहेत वाटतं ! चला ना आतां घरांत. रात्र झाली कीं.

**मंदार**—नलिनी, चंद्रिका यावेळीं एका—

**चंद्रिका**—अंहं मंदार, तिला तें सांगायचं—

**नलिनी**—मंदार, मला काय सांगायचं नाहीं ? तुम्ही कांहीं तरी सांगूं पाहतां आणि चंद्रिकाताई तुम्हांला तें सांगूं देत नाहीं असंच ना ?

**चंद्रिका**—नलिनी, चल बाई घरांत. उशीर झाला बराच.

**नलिनी**—अ हं. मला सांग काय आहे तें ! अर्धवट कशाला बोललांत !

**मंदार**—तुम्ही शांतपणानं ऐकून घ्या. चंद्रिका संकटांत आहे. तिनं नानासाहेब जहागिरदारांशीं लग्न लावायचं ठरवलं आहे. भाऊ-साहेबांकडे असलेली रक्कम वसूल होते कां नाहीं याचा अंदाज करण्या-साठीं तोटके काल तुमचेकडे आला आणि त्यानं जर नलिनीचं लग्न

नानासाहेबांशीं होईल तर रक्कम द्यावी लागणार नाहीं असं सांगितलं. तोटकानं तुमची चौकशीहि केली, तेव्हां चंद्रिकेनं झट्दिशीं पुढं होऊन त्याला नमस्कार केला.

**नलिनी**—चंद्रिकाताई, म्हणजे मीच नलिनी आहे असं तूं भासवलंस! कशाला बरं? छेः हें कांहीं तरीच तूं करून बसलीस!

**मंदार**—चंद्रिकेवरची ही आपत्ति टाळायची असेल तर तुम्हांलाच नानासाहेबांपाशीं—

**नलिनी**—काय मी! अन् त्यांच्याशी लग्न करूं? मंदार, तुम्ही काय म्हणतां हें? चंद्रिकाताई, चल, लवकर घरांत चल, मला घेरी येऊं पहात आहे. चल.... (एकदम घेरी येऊन चंद्रिकेच्या अंगावर पडते.)

**चंद्रिका**—अगबाई, मंदार! चला लवकर, हिला आपण आतां घरांत नेऊन ठेवूं. उगाच सांगितलंत तुम्ही तिला मंदार; ती कालच्या शॉकमधून पुरती बरी झालेली नाहीं.

**मंदार**—चंद्रिके, घाबरूं नको; चल हिला घरांत घेऊन जाऊं.

(पडदा पडतो.)

**अंक २ रा समाप्त.**



# अंक ३ रा

(नानासाहेब सावकार यांचा वाडा. या वाड्याच्या वरच्या मजल्यावर एक मोठा दिवाणखाना आहे. या दिवाणखान्याच्या प्रत्येक भिंतीवर कांहीं विवक्षित अंतरावर मोठे बिल्लोरी आरसे लावलेले आहेत. दोन आरशांच्या मध्यें रविवर्म्याचीं चित्रें लावलेलीं आहेत. दिवाणखान्यामध्यें फर्निचर पुष्कळ आहे. पण तें ओबडधोबड आहे. सबंध दिवाणखान्यांत बैठक टाकलेली आहे. दिवाणखान्याच्या मध्यभागीं एका चौरस गादीवर एका प्रशस्त लोडाशीं टेंकून नानासाहेब एक त्रिचनापल्ली चिरूट फुंकीत बसले आहेत. जवळच तोटक पान खाण्याच्या इराद्यानें पानाच्या शिरा मोठ्या सावधपणानें काढीत बसला आहे.)

**नाना०**—तोटक तूं अगदीं मूर्ख आहेस.

**तोटक** (त्यांच्याकडे आश्चर्यानें पाहतो.)

**नाना०**—असा काय पहातोस माझ्याकडे शुंभासारखा? माझ्याकडे पंचवीस वर्षें नोकरी करून तुला बिलकुल अक्कल आलेली नाहीं!

**तोटक** (शांतपणें पानाचा विडा करून खातो व नंतर तंबाखूचा बार भरतो.)

**नाना०**—तुला कितीदां तरी सांगितलं असेल कीं तंबाखूचें व्यसन अगदीं गांवढळ आहे. माझ्यापुढें इतउत्तर तूं तंबाखू खातां कामा नये. रस्टिक कुठला? छे: छे, तोटक, अरे मी आतां कौन्सिलांत निवडून येऊन आमदार झालों कीं तुला माझा प्रायव्हेट सेक्रेटरी करणार होतों. पण तूं असा खेडवळ. तुला पँट तरी घालायची ठाऊक आहे कां रे खेडवळा?

**तोटक**—(हंसून) ह: ह: अहो, आतांच तर कुठें नऊ वारी धोतर नेसण्याइतका पगार मिळायला लागला—

**नाना०**—हरामखोर कुठला? तूं मुळींच पैसे मिळवीत नव्हतास तेव्हां काय नागडा हिंडत होतास वाटतं?

**तोटक**—तसं नव्हे नानासाहेब! अहो आमच्या सारख्यांनीं पँट का फँट नेसावी कशी? शिवाय विंग्रजी तर एक शब्द येत नाहीं! पँट नेसलों तर तिकडूनहि फजीतीच. आतां आमच्या उत्पन्नांतून संसार-खर्च वजा जातां पँटला पैसा शिल्लक राहीलच कसा? अहो मला पोरंच तर तेरा झालीं!

**नाना०**—तेरा! काय म्हणतोस तेरा पोरं झालीं तुला? पशू! अगदीं पशू आहेस तूं!

**तोटक**—आतां पशू म्हणा कीं कांहीं म्हणा! तेरा पोरं झालीं, त्यांपैकीं सात जिवंत आहेत. त्याशिवाय आम्हीं दोघं नवराबायको. सांगा आतां, या नऊ जिवांचं तीस रुपयांत कसं व्हावं? माणशीं ३ रुपये ५ आणे ४ पं येतात दरमहा!

**नाना०**—ताटक, तूं पैशाचं रडगाणं गातोस, पण कधीं पैशाच्या फिकिरींत मात्र दिसत नाहींस. यांतलं रहस्य काय?

**तोटक**—अहो जें देवानं दिलं त्यांत समाधान न मानून सांगतां कुणाला? श्रीमंतांची सेवा करीत आहोंतच. श्रीमंत सर्वज्ञच आहेत. श्रीमंतांना दया आली तर ते मला रंकाचा रावही करतील! मी हें काय जाणून नाहीं! म्हणूनच पगारवाढ करा असा मी आपल्यापाठीमागें लकडा लावीत नाहीं.

**नाना०**—तोटक्या, तुला आजपासून आम्ही पगारांत दहा रुपये वाढवले आहेत; आतां जास्त अक्कलहुशारीनें काम करीत जा. काय समजलास!

**तोटक** — श्रीमंतांचे उपकार याजन्मीं तरी फिटणार नाहींत! काय हें औदार्य! मी तर अगदीं दिपूनच गेलों!

**नाना०** — तोटक्या, उगाच फाजील स्तुति करूं नको. मला स्तुतीचा फार तिटकारा आहे. बरं पण, काय रे तोटक, अजून भाऊसाहेबांकडून कांहींच जबाब आला नाहीं, हें कसं काय?

**तोटक** — अहो, ती काय सोपी गोष्ट आहे? आतां त्यानां दुहेरी पेंच पडला असेल. आपली मागणी कबूल न करावी तर वाडा जाणार. बरं मागणी कबूल करावी तर—तर—

**नाना०** —असं तर-तर-काय करतोस? मी बिजवर असलों म्हणून म्हातारा आहे कीं काय? अरे त्यांची मुलगी जर माझ्या घरीं आली तर तें तिचें भाग्य समज.

**तोटक** — आपणांला कोण म्हातारं म्हणणार? पण या अलीकडच्या शिकलेल्या पोरी. यांना जरा प्रथमवर असला म्हणजे—

**नाना०** — प्रथमवराविषयीं ही उगाच आपली कांहीं तरी कल्पना आहे झालं. अरे, संसाराचा अनुभव या दृष्टीनं बिजवरच प्रथमवरापेक्षां श्रेष्ठ ठरतो. आजकालच्या या कोंवळ्या पोरांना संसाराचा काडीमात्र अनुभव असतो का?

**तोटक** — खरंच. लग्न करण्यापूर्वी, संसार करण्याची एखादी प्रयोगशाळा असेल, तर तींत संसाराचे प्रयोग करावे आणि मगच लग्न करावं!

**नाना०** — ताटक्या! फार जीभ लांब करतोस. तूं म्हणतोस याचा अर्थ तरी तुझ्या लक्षांत आला आहे कां? मूर्ख कुठला.

**तोटक** — छे! छे! छे! मी-मी त्या अर्थानें म्हटलं नाहीं कांहीं! शिव! शिव! आपल्या हें मनांत तरी कसं आलं! शांतं पापं! शांतं पापं! या तोटक्याच्या मनांत असले पापी विचार कधींच येत नाहींत!

**नाना०** — कृति करायला संधि मिळत असेल; मग कशाला येतील पापी विचार मनांत! तोटक्या, अरे मी तुला काय ओळखत नाहीं?

**तोटक** — विष्णवे नमः! विष्णवे नमः। नानासाहेब, हा तोटक आतांपर्यंत भलत्या मार्गानं गेला नाहीं बरं! आज इतकी वर्षं वयाला झालीं पण कधींही परस्त्रीकडे वांकडा डोळा करून मी पाहिलं नाहीं.

**नाना०** — वांकडाच डोळा कशाला हवा! वांकडा डोळा न करतां गुपचूप व्यवहार करणारे बिलंदर कमी नसतात! त्यांतलाच तूं एक! मी काय तुला ओळखत नाहीं!

**तोटक** — धनीसाहेब, आपणांपुढें आतां मी काय बोलणार! मी गरीब मनुष्य! प्रपंच भागवतां होते मुष्कील. तुम्ही म्हणतां तसे रंगढंग करायला माझ्याजवळ पैसा आहे कुठं? शिवाय वेळही नाहीं. इथून, दमून भागून जो जातों तो अगदीं मेल्यासारखा पडतों.

**नाना०** — मूर्ख खराच! अगदीं मेल्यासारखा पडतोस नाहीं कां रे?

**तोटक** — नाहीं, म्हणजे तसं नाहीं. असा शब्दशः अर्थ घ्यावयाचा नाहीं. ह्यः ह्यः ह्यः कमाल आहे बुवा आपली. आतां काय बोलणार इथं. भाऊसाहेबांसारखेच आपण कोटीबाज आहांत!

**नाना०** — तोटक्या, आतांपर्यंत हीं एकच गोष्ट तूं खरी बोललास. भाऊसाहेबांची गोष्ट काय विचारावी! त्यांच्यासारखा कोटीबाज आणि

उमदं भाषण करणारा माणूस या प्रांतांत दुसरा सांपडणार नाहीं. अगदीं नाइलाज म्हणून मला त्यांना नोटीस पाठवावी लागली.

**तोटक** — नानासाहेब, एक शंका आहे!

**नाना०** — अरे तोटक्या, तूं अशा शंका कुशंकांतच मरणार एक दिवस. शंका तुझ्या अंगांत इतकी भिनली आहे कीं तूं मेल्यावर, तुझ्या मरणाबद्दलसुद्धां लोक शंका घेतील!

**तोटक** — वा! फार छान! पण इतक्यांत मरायला माझा जीव जरा अळंटळं करतो बुवा.

**नाना०** — घाबरूं नकोस! तूं चांगला टणका आहेस म्हणा!

**तोटक** — श्रीमंतांच्या कृपाप्रसादानं शरीरप्रकृति तर ठीक आहे. पण माझी शंका अशी कीं समजा भाऊसाहेबांना कुठून तरी पैसे मिळाले तर—

**नाना०** — अपशकुनी कुठला! झालं काय तुला असं बोलायला! अरे पैसे काय झाडाला लागले आहेत! आणि तारणाशिवाय इतकी रक्कम भाऊसाहेब झाले म्हणून देतो कोण! शिवाय वाडा जाऊं देणं भाऊसाहेबांना परवडणार नाहीं!

**तोटक** — असं म्हणतां?

**नाना०** — शवटीं कारकून तो कारकूनच! अरे तोटक्या, तुला मनुष्यस्वभावाचं काडीमात्र ज्ञान नाहीं! कोणीं झाला तरी प्रथम आपला स्वार्थ पहातो! परोपकार, उदात्त भावना या नुसत्या गप्पा आहेत! भाऊसाहेब झाले म्हणून त्यांना काय स्वतःची सुखलोलुपता थोडीच सुटली आहे? एवढ्या मोठ्या वाड्यांत ऐश्वर्यानें राहिलेला माणूस, तो

काय आतां तीन चार खोल्या घेऊन एखाद्या कारकुनासारखा भातुकली-वजा संसार थाटील? अरे, मनुष्य प्रथम स्वार्थ बघतो आणि मगच अनुकूलता असेल तर परोपकाराच्या भानगडींत पडतो!

**तोटक** — पण इथं स्वतःच्या पोटच्या पोरीचा प्रश्न आहे म्हणून म्हणतों—

**नाना०** — अरे कसली आली आहे पोटची पोर? निःस्वार्थ बुद्धीनें पोरींचं हित पहाणारे बाप असते तर जख्खड म्हाताऱ्यांच्या गळ्यांत कोंवळ्या लुसलुशीत पोरी पडल्याच नसत्या.

**तोटक** — पण मी म्हणतों, समजा, भाऊसाहेबांना पैसे मिळाले तर आपल्याला कांहीं त्यांची पोरगी मिळणार नाहीं!

**नाना०** — अपशकुनी गद्धा कुठला! पुनः तेंच! अरे तोटक्या पन्नास हजार काय वाटेवर पडले आहेत? पुनः असं बोलूं नकोस! दहा रुपये कमी करीन तुझे!

**तोटक** — छे! छे! छे! तसं नको कांहीं व्हायला! मी आपली सहज शंका काढली! आपल्याला पटत नसली तर सोडून द्या. माझ्या गरीबाचं नुकसान कशाला!

**नाना०** — आतां कसा आलास वळणावर! कायरे, पण पोरगी फार सुरेख आहे नाहीं?

**तोटक** — आतां काय तिचं वर्णन करावं? मी कारकून मनुष्य. आंकडेमोडींत व हिशेबांत जन्म गेला—

**नाना०** — बरोबर आहे. अलंकारांनीं एखाद्या स्त्रीची शोभा किती वाढली आहे याकडे लक्ष जाण्यापेक्षां, किती किंमतीचे अलंकार तिच्या अंगावर आहेत याचाच तूं हिशोब करणार! तुझी भाषाच मुळीं आंकड्यांची!

**तोटक** — होय! अगदीं खरं! आतां सांगा आंकड्यांनीं एखाद्या स्त्रीचें वर्णन करतां येईल कां?

**नाना०** — अगदींच अरसिक! एखाद्या सुंदर इमारतीकडे पाहून रसिक मनुष्य तिच्या सौंदर्याची प्रतीति घेईल तर एखादा इंजिनिअर, त्या सौंदर्याकडे पहावयाचें सोडून, मनांतल्या मनांत, तिच्या निरनिराळ्या भागांचं मोजमाप घेत बसेल! तोटक, सुंदर स्त्रीच्या बाबतींत तुझ्या-सारखा अरसिक मनुष्य अगदीं असंच करील याविषयीं मला तरी शंका नाहीं.

**तोटक** — पण मी तिचं संक्षिप्त वर्णन करतों.

**नाना०** — मूर्ख कुठला? अरे सुंदर स्त्री म्हणजे काय एखादा अपूर्णांक आहे तर त्याला संक्षिप्त रूप देतां येईल? तोटक, तूं खरोखर एखाद्या टीपकागदासारखा आहेस. तो जसा फक्त शाई शोषून घेतो तसंच तुला फक्त लोकांचे दोष दिसतात, पण गुण-सौंदर्य किंवा सौंदर्य-गुण मुळींच दिसत नाहींत! बरं, हरकत नाहीं! संक्षिप्त वर्णन कर! तूं संक्षिप्त वर्णन केलंस म्हणून तिचे अवयव संक्षिप्त होणार नाहींत किंवा तिच्या सौंदर्यालाहि संक्षेप मिळणार नाहीं!

**तोटक** — आपण अगदीं आज थेट भाऊसाहेबांसारखं बोलत आहां! तुम्हांला खरं सांगू! भाऊसाहेबांची मुलगी फारच सुरेख आहे!

**नाना०**—नेहमीं डबक्यांतच तोंड घालणाऱ्यांना पुष्करिणीची जशी कल्पना येणार नाहीं तद्वतच खऱ्या सौंदर्याची व तुझी आजन्मांत गांठ नसल्यामुळें तुला त्याचं वर्णन तरी कसं साधणार? तोटक, तूं फक्त आंकडेमोडच करावीस! स्त्रीसारखा अपूर्णांक तुला कसा समजणार?

**तोटक**—स्त्री हा अपूर्णांक म्हणतां पण पुरुष हा त्या अपूर्णांकाचा अंश कीं छेद? आज सुंदर स्त्रीचं वर्णन गणिताच्या दृष्टीनं करणार कीं काय धनीसाहेब!

**नाना०**—सौंदर्यांतहि गणित आहे! सौंदर्य प्रमाणबद्ध असलं तरच तें खुलून दिसतं! तोटका, तुला व्यर्थ व्यर्थ भाऊसाहेबांकडे पाठविला!

**तोटक**—मी तुमचा निरोप सांगायला गेलों होतों. मला काय माहीत कीं त्यांच्या मुलीला नीट पाहून ये अशी तुमची गर्भित आज्ञा आहे म्हणून?

**नाना०**—अरे असल्या गोष्टी सांगायच्या नसतात. समजायच्या असतात.

**तोटक**—पण धनीसाहेब! इतका उतावळेपणा कां! समजा, भाऊसाहेबांची मुलगी तुमची व्हायचीच असली तर मी म्हणतों नुसतं तिच्या सौंदर्याचं वर्णन करून तरी लाभ काय? बरं मी म्हणतों मी तिच्या सौंदर्याचं खूप वर्णन केलं; उपयोग काय? उलट तुमची उत्कंठा वाढून तुम्हांला त्रास मात्र व्हायचा!

**नाना०**—एका अर्थानं तूं म्हणतोस तें खरं आहे! प्रत्यक्ष सौंदर्याच्या उपभोगापेक्षां त्या उपभोगाची कल्पनाच अधिक उन्मादकारी असते. भाऊसाहेबांची मुलगी माझी होणारच याविषयीं वाद नाहीं!

भाऊसाहेब पैसे उभे करूं शकत नाहींत. वाडा हातचा जाऊं देणं हेंहि त्यांना जमणार नाहीं; तेव्हां मला मुलगी दिल्यावांचून त्यांना गत्यंतर नाहीं. तोटक! मी डावच तसा टाकला आहे.

**तोटक** — आपण म्हणतां तें कांहीं खोटं नाहीं; पण–

**नाना०** — पण–पुन्हां पणच–तोटक, आज शंकेशिवाय बोलायचं नाहीं असा तूं पणच केलेला दिसतोस. सांग बरं तुझ्या शंका. मी निराकरण करतों.

**तोटक** — असं पहा, भाऊसाहेब स्वभावानं फारच उमदा मनुष्य! काय वाटेल तें झालं, तरी ते त्या मुलीचं नुकसान होऊं देणार नाहींत!

**नाना०** — तोटक्या, माझ्याशीं लग्न होणं म्हणजे नुकसान आहे काय! अरे या नानासाहेबासाठीं, मी विधुर झाल्यापासून किती मुली तप करताहेत. कितीक मुलींचे बाप जोडे फाडताहेत–

**तोटक** — (स्वगत) पुढें चांगले जोडे घालायला मिळावे म्हणून— मग इकडे मुलगी मनांतल्या मनांत बापाला कितीका जोडे मोजीना! (उघड) हो, हो, हें सगळं होतंच आहे ना! मी रोज पहातों ना—

**नाना०** — तोटक्या! खरं सांग! तूं नुकसान असं कां म्हणालास? मी तुला स्पष्ट विचारतों कीं माझ्यांत काय कमी आहे! स्पष्ट सांग. मला खुशामत आवडत नाहीं!

**तोटक** — धनीसाहेबांचा तर हाच मोठा अवगुण कीं त्यांना खुशामत आवडत नाहीं! आतां खरं म्हणाल तर आपल्याला कांहीं सुद्धां कमी नाहीं. संपत्ति आहे, नोकर आहेत, चाकर आहेत, विद्वत्ता आहे, खुबीदार बोलणं आहे, धडधाकट शरीर आहे — कोण म्हणतो

आपल्याला कांहीं कमी आहे म्हणून? (स्वगत) पण बोलून चालून तूं शिळाभात! सुग्राम अन्नाची रुचि असलेली कोणती मुलगी असला शिळाभात खाणार?

**नाना०** — नोटक्या! मनांतल्या मनांत कांहीं पुटपुटतोस वाटतं!

**नोटक** — कोण! मी? छे! छे! मला उघड बोलायला चोरी थोडीच आहे! आपण तर आतांच सांगितलं कीं मला खुशामत आवडत नाहीं म्हणून! आपलं तर असं ठाम मत आहे कीं आपल्याला कांहीं कमी नाहीं म्हणून!

**नाना०** — गाढवा, मला कांहीं कमी आहे का असं नाहीं कांहीं मी तुला विचारलं! माझ्यांत काय कमी आहे असं मीं तुला विचारलं!

**नोटक** — अस्सं! अस्सं! इतका बारीक फरक आमच्या ध्यानांत कुठून येणार! हा प्रश्न मात्र बिकट आहे खरा! म्हणजे रूप गुण इत्यादिकांनीं म्हणतां?

**नाना०** — नोटक, साऱ्या जन्मांत तुला आजच माझा प्रश्न इतक्या लवकर समजला. खरं सांग, मला स्तुति आवडत नाहीं.

**नोटक** — कठीण आहे बुवा हें सांगणं —

**नाना०** —त्यांत काय कठीण आहे? अशी कल्पना कर कीं तुला एक मुलगी आहे —

**नोटक** — आं?—

**नाना०** — घाबरायला काय झालं? मी कांहीं तुझ्या मुलीला मागणी घालीत नाहीं.

**तोटक** — तसं नव्हे— अहो कल्पना कशाला, मला प्रत्यक्ष मुलगी आहेच कीं.

**नाना०** — तर मग असं समज कीं तूं मला मुलगी देऊं चहातोस; आतां तूं माझं कोठच्या दृष्टीनं परीक्षण करशील?

**तोटक** — (स्वगत) काय या बुद्रुकाला उत्तर देऊं? (उघड) आपण त्या दृष्टीनं विचारच केला नाहीं बुवा. पण रूपगुणानं म्हणाल तर ते आपल्याजवळ कांहीं कमी नाहींत.

**नाना०** — झालं तर! मग सांग भाऊसाहेबांची मुलगी मला कां मिळूं नये? माझा तर असा होरा वाहतो कीं आज भाऊसाहेबांकडून या बाबतींत कांहीं कळलं पाहिजे.

(एक नोकर येतो)

**नोकर** भाऊसाहेब खालीं आले आहेत.

**नाना०** — काय म्हणतोस! अरे तोटक्या जरा ही बैठक साफ कर. पानं आणायला सांग. सिगारेट आहे कीं नाहीं. अरे रामा, कापी ठेवायला सांग बरं लवकर. अरे, त्यांना वर पाठवून दे पाहूं. तोटक्या नीट अदबीनं बैस जरा!

**तोटक** — हो! हो! भाऊसाहेब व आपण सारखेच. हें काय सांगायला पाहिजे!

(भाऊसाहेब प्रवेश करतात)

**नाना०** — अलभ्य लाभ! अलभ्य लाभ! या बसा; भाऊसाहेब असे लोडाशीं या!

**भाऊ०**—नानासाहेब, आपण इतका आदरसत्कार करतां हें भाग्यच म्हणायचें!

**नाना०**—इतक्या तीव्रतेनं बोलायची काय जरूरी आहे! आपण शांत राहाल अशी मी आशा करतों.

**भाऊ०**—मी शांतच आहे. सुमारें महिन्यापूर्वी आपणांकडून मला एक नोटीसवजा पत्र आलं, आणि त्यानंतर परवांच चार दिवसांच्या मुदतीची आणखी एक नोटीस आली.

**नाना०**—भाऊसाहेब, जरा स्वस्थ तर व्हा. व्यवहाराचं काय? बोलूं या आपण. अरे तोटक, कॉफी झाली का बघ जरा.

**तोटक**—जातोंच मी (स्वगत) आपण आतां इथून जावं. या दोघांना खुशाल बसूं दे भांडत. (जातो)

**नाना०**—भाऊसाहेब, आपण अगदीं निर्विकार मनानं बोलावं अशी माझी इच्छा आहे. मी पत्र व नोटीस पाठवली ही गोष्ट कबूल. आपल्याला दुखवावं अशी माझी काडीमात्रहि इच्छा नव्हती. आपला बाळपणींचा स्नेह आणि त्यानंतरचाहि आपला उभयतांचा इतक्या वर्षांचा संबंध लक्षांत घेतां, आपणांला, तीं दोनहि पत्रं लिहितांना माझ्या मनाला काय यातना झाल्या असतील याची कल्पनाच करा. परंतु रक्कम मोठी पडली. तीं पत्रें लिहितांना, त्या रकमेच्या दसपट, माझ्या मनाला वेदना झाल्या.

**भाऊ०**—आपण स्वतःच सांगत आहां तर, आपल्या मनाला अनंत यातना झाल्या असतील, हें आपलें वाक्य मी खरं धरून चालतों. पण आपल्या कारकुनानं आपली खासगत म्हणून जी इच्छा प्रदर्शित

केली, तीवरून आपल्या मनाला यातना झाल्या, कीं आणखी कांहीं वाटलं हें मात्र सांगणं कठीण आहे.

**नाना०** — छे! छे! गैरसमज करून घेऊं नका बरं भाऊसाहेब! अरे कॉफी झाली का? अरे वा! आलीच वाटतं (एक नोकर एका ट्रेमध्यें कॉफीचे दोन पेले घेऊन येतो व त्या उभयतांच्या पुढें एक चौरंग ठेवून त्यावर कॉफीचे पेले ठेवतो.) घ्या, कॉफी तर घ्या. तुमचा गैरसमज या कॉफीच्या पेल्यांत बुडवा.

**भाऊ०** — पण तो उष्ण निश्वसितें टाकीत आहे हें ध्यानांत घ्या. असो. (उभयतां कॉफी घेतात) मला तुम्हांला सांगायचं इतकंच कीं—

**नाना०** — जरा दमानं घ्या भाऊसाहेब! आपण आज जरा संतापलेले दिसतां!

**भाऊ०** — गैरसमज करून घेऊं नका. मी अगदीं शांत मनानें सर्व गोष्टींचा विचार करून आलों आहे. आपण दिलेली मुदत उद्यांच संपेल. तत्पूर्वींचा साधक बाधक गोष्टींचा सर्व विचार करून मी आज जवाब देण्यास आलों आहे.

**नाना०** — भाऊसाहेब, मुदतीचं काय मोठंसं! आणखी वाढवितां येईल. पण आपण केवळ विकारवश होऊन जबाब देऊं नये हीच माझी इच्छा आहे

**भाऊ०** — नानासाहेब, विकारवशाता फार तर क्षणाचीच असते, किंवा तसंच बलवत्तर कारण असेल तर तिची तीव्रता अधिक वाढेल. विकारापेक्षां विचारांचंच आयुष्य जास्त. मी तीन दिवस या गोष्टीचा विचार केला आहे, तेव्हां आपण म्हणतां तशी विकारवशाता आतां माझ्या

मनांत उरली नाहीं. माझं उत्तर पूर्णपणें विचार करूनच दिलेलं आहे असं आपण समजा.

**नाना०**—मग हरकत नाहीं. नाहींतर विकाराच्या भरांत मनुष्य कांहींतरी बोलून जातो व मग होतो पश्चात्ताप.

**भाऊ०**—पूर्वतापचं पुष्कळ झाला असल्यामुळें आतां पश्चात्तापाची भीतिच उरली नाहीं. मी आपल्याला स्पष्ट सांगतों कीं आपल्या कारकुनानं सुचविल्याप्रमाणें, मी माझी मुलगी आपल्याला द्यावयास तयार नाहीं!

**नाना०**—काय? काय? काय म्हणतां आपण! तर मग आपण रकमेची फेड करणार?

**भाऊ०**—नाहीं; तेंही सामर्थ्य मजमध्यें नाहीं. पण मी आपणांस वाडा विक्री करून द्यावयास तयार आहें!

**नाना०**—काय! काय, ऐकतों मी हें! भाऊसाहेब, आपण इतके दिवस ज्या थाटांत व ऐश्वर्यांत त्या वाडयांत काढले तें ऐश्वर्य व तो थाट सोडून देण्याचं आपल्याकडून होईल कां? कारण कीं आपल्या-सारखा स्वाभिमानी मनुष्य वाडा विकून टाकल्यानंतर त्याच वाडयांत भाडयानें रहायला तयार होईल असं मला वाटत नाहीं. मग काय तुम्ही एखाद्या सामान्य माणसासारखं कुठं तरी चार पांच खोल्या घेऊन राहणार? छे, ही कल्पनाच मनाला पटत नाहीं.

**भाऊ०**—मी पूर्ण विचार केला आहे. माझा निश्चय आतां विधाताहि पालटूं शकणार नाहीं. तेव्हां माझं उत्तर कायम समजा.

**नाना०**—भाऊसाहेब, राग येऊं देऊं नका! पण इतकं वैतागण्याचं कारण काय? मी आपल्याला स्पष्टच विचारतों, कीं

मजमध्यें काय इतकं वैगुण्य आहे कीं आपण मला आपली मुलगी देण्यास तयार होऊं नये ?

**भाऊ०**—वाडे गेले तर पुनः बांधता येतील पण मुलीचं मन नाश पावलं तर तें कांहीं पुनः निर्माण होऊं शकत नाहीं! आपल्याला माझी मुलगी द्यावी असं मला मुळींच वाटत नाहीं. स्पष्टोक्तीबद्दल क्षमा करा.

**नाना०**—भाऊसाहेब, आपण जो एवढा स्वार्थत्याग करायला तयार झाला आहां तो प्रशंसनीयच; पण व्यवहार कांहीं पहावा लागतो. मी असं विचारतों कीं माझ्यासारख्या बिजवरांचीं आजपर्यंत लग्नंच झालीं नाहींत कीं काय! त्यांनाही कोणीतरी मुली दिल्याच ना? मग आपणच कां त्याला अपवाद होतां! मी कांहीं अगदीं जख्ख थेरडा नाहीं.

**भाऊ०**—.गोष्ट खरी, पण हा ज्याच्या त्याच्या मनोवृत्तींचा प्रश्न आहे. मला मुलगी द्यावीशी वाटत नाहीं हेंच खरं.

**नाना०**—जशी आपली मर्जी. तुमचा वाडा घेतांना मला फार दुःख होतं पण माझा नाइलाज आहे. आतां, मला वाटतं कीं उद्यांच आपण विक्रीपत्र लिहून टाकूं.

**भाऊ०**—आपण म्हणाल तेव्हां मी विक्रीपत्र लिहून द्यायला तयार आहें. ठीक आहे, मी निरोप घेतों—

(चंद्रिका एकदम प्रवेश करते)

**चंद्रिका**—थांबा, थांबा, अविचारानं भलतंच कांहीं होऊं देऊं नका. भाऊसाहेब, कां उगाच सगळ्यांच्या व स्वतःच्या सुखांत माती कालवतां? भावनेच्या भरांत आज वाडा घालवाल, पण पुढें दुसऱ्याच्या

घरांत राहतांना, नकोसं होईल. आजपर्यंत जें केलं नाहीं तें आतांच कसं होईल ?

**भाऊ०**—केलं म्हणजे होतं ! पण तूं कां इकडे आलीस ?

**चंद्रिका**—आपण वाड्यासंबंधीं अखेरचं बोलणं करण्यासाठीं यांच्याकडे आलां आहां असं मला घरीं कळलं. आपल्या निर्णयाचा अदमास मला आलाच होता. आपल्याकडून भलतंच कांहीं तरी होऊं नये म्हणून मी तडक इकडे आल्यें.

**भाऊ०**—माझ्या हातून भलतंच होणार! पोरी, तूं मला शिकवतेस काय ?

**चंद्रिका**—नाहीं; मी काय शिकवणार! पण मला वाटतं कीं आपण वाडा हातचा जाऊं देऊं नये! यांना मी एकच विनंति करते कीं यांनीं भाऊसाहेबांचा वाडा घेण्याचा हट्ट सोडून द्यावा.

**नाना०**—माझा कुठं हट्ट आहे ?

**चंद्रिका**—मग भाऊसाहेबांनीं आपली मुलगी द्यावी, म्हणजे मग हें संकट टळेल या सूचनेचा अर्थ काय ?

**नाना०**—तुम्हीच भाऊसाहेबांची मुलगी काय ?

**चंद्रिका**—(चांचरत) होय मीच. मीच ती नलिनी. आपली ही अट तितकी बिनतोड नाहीं. कारण भाऊसाहेबांना पैसे मिळाले तर!

**नाना०**—अशक्य आहे. पन्नास हजारांची रक्कम लहानसहान नाहीं. ती भाऊसाहेब एका दिवसांत उभारूं शकत नाहींत. तेव्हां वाडा विकावयाचा नसेल तर भाऊसाहेबांनीं मुलगी दिलीच पाहिजे.

**भाऊ०**—पोरी, हा अतिप्रसंग होत आहे. मी जर वाडा विकून टाकण्यास तयार आहें असा माझा निश्चय मी नानासाहेबांना आतांच कळवून चुकलों आहे, तर तूं कां अशी आडकाठी आणते आहेस ?

**नाना०**— हें पहा, खरेदीखत उद्यांच झालं पाहिजे.

**भाऊ०**— माझी त्या गोष्टीला केव्हांहि तयारी आहे ; आपणांला मी सांगितलंच आहे कीं आपण मागाल तेव्हां मी खरेदीखत लिहून द्यावयास तयार आहें. उद्यांच खरेदीखत करून टाकूं.

**चंद्रिका**— तसं करण्याची जरूर नाहीं.

**नाना०**—<br>**भाऊ०**— } काय! काय म्हणतेस तूं हें ?

**चंद्रिका**— वाडा विकला जाणार नाहीं. (दुःखानें पण निश्चयानें) मी यांच्याशीं लग्न लावायला तयार आहें. मात्र लग्नाची घाई करतां कामा नये. (नानासाहेबांस) आतां तरी आपण वाडा खरेदी घेण्याचा हट्ट सोडून द्याल काय ?

**नाना०**— सोडला! सोडला! मी तुमचा शब्द प्रमाण मानतों. तुम्ही म्हणतां तर लग्नाची घाई करणार नाहीं. पण जरा लवकरच झालेलं बरं. म्हणतात ना, लग्न ठरलं कीं तें लवकर उरकून घ्यावं. नाहींतर पाठीमागून मोडतं.

**चंद्रिका**— त्याविषयीं आपण निश्चिंत असा. मी आपल्याशीं लग्न लावायला तयार आहें यांत सारं कांहीं आलं.

**भाऊ०**— (चंद्रिकेस) हा काय तूं अविचार करते आहेस! माझी अनुज्ञा नको काय ?

**नाना०** — ती सज्ञान आहे आतां.

**भाऊ०** — म्हणून काय झालं! तिला स्वत:चं सुख समजत नाहीं असंच आतां म्हणण्याची वेळ आली आहे! छे: छे: ही गोष्ट मी होऊं देणार नाहीं!

**नाना०** — अहो! पण ती तयार आहे ना! तुम्ही आतां कां उगाच शिरा ताणतां!

**चंद्रिका** — तुमचं साऱ्यांचं सुख तेंच माझं सुख. मी यांना जें एकवार सांगितलं तेंच पुन: सांगतें. यांनीं मात्र वाडा खरेदी करण्याचा—

**नाना०** — लग्न झालं कीं प्रॉमिसरी नोट फाडलीच म्हणून समजा. अशी मुलगी आपण होऊन घरांत चालून येत असल्यावर त्या प्रॉमिसरीची काय किंमत आहे?

**भाऊ०** — मूर्ख पोरी! तूं काय हें भलतंच करून बसलीस! मला आतां खात्रीनं वेड लागणार. अजून विचार कर, आणि आपले शब्द परत घे!

**नाना०** — भलतंच! आपलीच मुलगी ती! तिचाहि निश्चय आपल्यासारखाच अभेद्य असणार! नलिनी, तुझे शब्द मला प्रमाण आहेत. जा. वाड्याची काळजी करूं नको. खरेदीखत होत नाहीं.

**भाऊ०** — नानासाहेब —

**चंद्रिका**— शांत व्हा भाऊसाहेब. उगाच आतां जास्त बोलूं नका. मी तुम्हांला सारं कांहीं सांगतें. चला बरं घरीं.

**भाऊ०** — (मुस्कारा टाकून) बरं, नमस्कार नानासाहेब.

**नाना०** — नमस्कार! मला फार आनंद झाला. निश्चयाच्या बाबतींत उभयतां पितापुत्री अगदीं सारखी. नलिनी, जा, भाऊसाहेबांना शांत कर; फारच उमदा स्वभाव त्यांचा. समजूत घाल त्यांची. काळजी करूं नको. वाड्याचं खरेदीखत होत नाहीं.

( चंद्रिका व भाऊसाहेब जातात )

**नाना०** — तोटक, अरे तोटक. (तोटक येतो.)

**तोटक** — हा आलों, धनीसाहेब. काय हुकूम आहे!

**नाना०** — नीट उभा रहा माझ्यासमोर! भाऊसाहेबांच्या मुलीचं व आमचं लग्न ठरलं.

**तोटक** — आं! काय ऐकतों मी हें.

**नाना०** — खरं तेंच! अरे माझा होरा चुकणार नाहीं. तूं आतां लग्नाच्या तयारीला लाग. मुहूर्त पाहून ठेव. छे! फारच गहिरी पोर आहे बुवा! आपण तर तिचं बोलणं व बोलण्याचा थाट पाहून चकितच झालों. तोटक, तुझा दोष नाहीं. तूं काय वर्णन करणार तिचं. फारच सुरेख! अरे नुसती सुरेख नाहीं तर नाजूक पण आहे.

**तोटक** — आं! सुरेख आणि नाजूक याच्यांत काय फरक आहे बुवा?

**नाना०** — गाढवच तूं! चल आतां चहा ठेवायला सांग जरा.

**तोटक** — अंहं!

**नाना०** — अरे, असे बायकांसारखे नखरे काय करतोस?

**तोटक**—आतां कारकून म्हणजे बायकोच ती! एखादं गाणं व पार्टी झाली पाहिजे या गोष्टीबद्दल.

**नाना०**—ठीक, ठीक, उद्यां ठरवून टाक. तुझ्या मनांत आहे तर करून टाक. चल, चहा पिऊन आतां फिरायला जावं जरा. (जातात)

(पडदा पडतो.)

**अंक ३ रा समाप्त.**



## अंक ४ था.

( भाऊसाहेब जहागिरदारांच्या वाड्यांतील नलिनीची खोली )

( नलिनी व मंदार प्रवेश करतात )

**नलिनी** — मंदार, माझी अशी निराशा होईल अशी कल्पना नव्हती.

**मंदार** — नलिनी, नाइलाज आहे माझा. प्रेमाला असं मुद्दाम वळण कसं देतां येईल? चंद्रिका हीच माझी जन्माची जोडीदारीण असं मला मनःपूर्वक वाटतं. तूंच सांग, तिच्याकडे माझं मन जें निसर्गानंच ओढलं जात आहे तें तुला कसं देतां येईल? दुसरी एक गोष्ट तुला सांगतों. स्वभावानं आणि इतर अनेक कारणांनीं अनिरुद्धच तुला योग्य आहेत. तूं स्वभावानं स्वातंत्र्यप्रिय आहेस. मीहि स्वातंत्र्य-प्रियच आहे. दोन स्वातंत्र्यप्रिय माणसांनीं एके ठिकाणीं येण्यांत फायदा काय? अशा माणसांचा संसार कितपत सुखावह होईल? केवळ भावनेच्या आहारीं जाण्यांत अर्थ काय?

**नलिनी** — पण चंद्रिका तर नानासाहेबांशीं लग्न लावायला तयार आहे; मग तुम्हांला माझी विनंति मान्य करण्यास हरकत कोणती?

**मंदार** — नलिनी, तुला शतशः धिक्कार असोत! भावनेच्या आहारीं जाऊन तूं काय बडबडते आहेस याची तुला कल्पना नाहीं. मनाच्या विरुद्ध चंद्रिका स्वार्थत्याग करावयास तयार झाली हा तिचा थोरपणा. ती पोरकी पोर, तुमची उपकृत, तुझं नुकसान होऊं नये म्हणून, ती नानासाहेबांचा कारकून तोटक याच्यापुढें, तुझी भूमिका घेऊन उभी राहिली. स्पष्ट बोलतों याचा राग येऊं देऊं नको. भाऊसाहेबांच्या

खर्चिक स्वभावामुळें ही आपत्ति तुमचेवर आली. जर पैशाची तजवीज झाली नाहीं, तर वाडा शाबूत रहावा अशी इच्छा असेल तर खुद्द भाऊसाहेबांच्या मुलीनंच, भाऊसाहेबांच्या सुखासाठीं या वेळेला स्वार्थ-त्याग करण्यास तयार व्हायला नको का? या वाड्यांत इतके दिवस भाऊसाहेबांनीं ऐश्वर्यांत काढले, त्यांना तूं नलिनी आतां कोठल्या तरी भिकार खोल्यांतून रहावयास लावणार काय?

**नलिनी**—तुमच्या तोंडून नुकताच हा प्रकार मला समजला. खरोखर हा प्रश्न मोठा नाजुक आहे. मला याचा विचार करावयास हवा. मला जरा वेळ एकटीच राहूं द्या.

**मंदार**—जशी तुझी इच्छा. मी जातों. (जातो.)

**नलिनी**—छे! कांहींच सुचत नाहीं. जरा पेटी तरी वाजवावी. (पेटी वाजवण्यास सुरवात करते इतक्यांत चंद्रिका येते.) चंद्रिके! तूं अशी कां दिसतेस!

**चंद्रिका**—तुला सारा प्रकार माहीत आहेच.

**नलिनी**—चंद्रिके, नानासाहेबांच्या पैशाची तजवीज कांहींच होण्यासारखी नाहीं. भाऊसाहेबांना सुद्धां हें ठाऊक आहे. शिवाय भाऊसाहेब व आम्ही आपखुषीनं यापुढील आयुष्य हालांत काढण्यास तयार आहोंत. मग तूं आपला हट्ट कां सोडीत नाहींस?

(भाऊसाहेब प्रवेश करतात)

**भाऊ०**—चंद्रिका हट्ट सोडो वा न सोडो, मी वाडा विकून टाकल्याशिवाय रहात नाहीं. स्वार्थत्यागाच्या भलत्याच कल्पनेनं दिशा-भूल होऊन चंद्रिका नानासाहेबांना शब्द देऊन बसली असली तरी,

ज्या मुलीला आजपर्यंत मी स्वत:च्या मुलीसारखी वागविली तिचं नुकसान मी होऊं देणार नाहीं.

**चंद्रिका** — पण भाऊसाहेब —

**भाऊ०** — मी तुझं ऐकणार नाहीं. जर तूं आपला हट्ट तडीस नेऊं पहाशील तर त्याचा फार विपरीत परिणाम होईल हें तूं लक्षांत ठेव.

**चंद्रिका**
**नलिनी** } (एकदम)—काय? तुम्ही म्हणतां याचा अर्थ तरी काय?

**भाऊ०** — मी म्हणतों याचा अर्थ आणखी स्पष्ट करून सांगण्याची जरूर नाहीं. चंद्रिकेला असं वाटतं कीं आपण वचनबद्ध झालों आहों. परंतु आवेशाच्या किंवा उन्मादाच्या भरांत दिलेलीं वचनं हीं कवडी-मोलाचीं असतात. आयुष्याच्या शेवटीं माझ्या नशिबीं कष्ट येऊं पहात आहेत. परंतु ते जर मी सुखानें सहन करीन असं म्हणतों तर केवळ माझे काल्पनिक कष्ट चुकविण्याकरतां चंद्रिकेनं जन्मभरच्या खऱ्या-खुऱ्या कष्टांत पडूं नये. चंद्रिका जर आपला हट्ट सोडणार नाहीं तर मलाहि आत्मघातावांचून दुसरा मार्ग उरणार नाहीं. (इतक्यांत मंदार प्रवेश करतो) मंदार, या दोनतीन दिवसांत चाललेल्या वाटाघाटी तुमच्या कानावर आल्या असतीलच; परंतु तुम्ही पाहुणे; या कष्टप्रद वाटाघाटी तुमच्या कानावर घालून, उगाच तुमच्या मनाला निष्कारण त्रास कां द्यावा या हेतुनं मी तुमच्याजवळ आतांपर्यंत एक अवाक्षरहि बोललों नाहीं. परंतु आतां मात्र मला तुमच्या विचारशक्तीची मदत अवश्य घ्यावीशी वाटते. तुम्हीच सांगा बरं, मी वाडा जाऊं द्यावयाला तयार असतांना, चंद्रिकेनं उगाच भलता हट्ट कां धरावा?

(अनिरुद्ध प्रवेश करतो)

**अनिरुद्ध**—(एकदम) Humbug ! सगळं कांहीं humbugging चाललं आहे. फुकट थिंगाणा आहे हा !

**मंदार**—आपण काय म्हणतां ? आपण म्हणतां त्याचा अर्थ मला तरी समजला नाहीं.

**अनिरुद्ध**—जग म्हणजे व्यवहार. तुम्ही सर्व काव्यप्रकृतीचे लोक दिसतां. हें पहा, मी तुम्हांला या संकटांतून सुटण्याचा एक सरळ मार्ग सुचवतों. मला दोष मात्र देऊं नका. मी पन्नास हजार रुपये देतों; नलिनीनं माझ्याशीं लग्न करावं.

**नलिनी**—माझं प्रेम तुम्ही पैशानं विकत घेऊं पहातां ! मला तुमच्याशीं लग्न करतां येणार नाहीं.

**अनिरुद्ध**—मी तुम्हांला मगाशींच सांगितलं कीं मला दोष देऊं नका. मी कांहीं परोपकारबुद्धीनें हें सांगत नाहीं; पहा, नलिनी, तुझ्या प्रेमासाठीं मी इतक्या मोठ्या रकमेवर पाणी सोडावयास तयार झालों; यांत, मी तुझं प्रेम विकत घेऊं पहातों असं कसं होईल ! मी वाडा विकत घेतों; मग तर तुझ्या प्रेमाची मी किंमत करतों असं होणार नाहीं ना ?

**चंद्रिका**—परंतु वाडा जाणारच !

**अनिरुद्ध**—होय. कांहीं तरी पत्करलंच पाहिजे.

**मंदार**—अनिरुद्ध, जरा थांबा; किंबहुना तुम्ही सर्व निघून जा, मला नलिनीशीं कांहीं बोलावयाचं आहे. नलिनी तूं इथंच थांब. (नलिनी आश्चर्यानें पाहते) आश्चर्यानें पहाण्याचं कारण नाहीं. जा, तुम्ही सारे (नलिनी खेरीज सर्व जातात.) नलिनी, तुझ्या स्वार्थवृत्तीची आणि मूर्खपणाची सीमा झाली.

**नलिनी**—कां तुम्ही मला असं तोडून बोलतां ! माझ्या प्रेमाचा धिक्कार करून, मला कटु शब्दांनीं ताडन करण्याचा तुम्हांला अधिकार नाहीं. मला जाऊं द्या.

**मंदार**—मी जाऊं देणार नाहीं. तुला थांबलंच पाहिजे. नलिनी, तुझ्या वडिलांचा एक हितचिंतक या नात्यानं तुला कटु शब्दांनीं ताडन करण्याचा मला पूर्ण अधिकार आहे; इतकंच नव्हे तर तुझ्या इच्छेविरुद्धहि तुला एक गोष्ट मी करावयास लावणार आहें. नलिनी, वस्तुतः तुलाच नानासाहेबांशीं लग्न करायला तयार झालं पाहिजे. चंद्रिकेकडे पहा, भाऊसाहेबांचं यापुढील आयुष्य सुखांत जावं म्हणून तिनं आपण होऊन, स्वतःच्या इच्छेविरुद्ध नानासाहेबांशीं लग्न करण्याचं कबूल केलं. ती तुम्ही पाळलेली एखादी अनाथ पोर असेल, म्हणून भाऊसाहेबांच्या अविचाराचं फळ तिनं भोगावं असं नाहीं. हें फळ, नलिनी, तूं भोगलं पाहिजेस. तूं भाऊसाहेबांच्या रक्तमांसाची आहेस. परंतु आतांपर्यंत, तुला एकदांहि असं म्हणावसं वाटलं नाहीं कीं 'भाऊसाहेब, तुम्ही निश्चिंत असा, मीच नानासाहेबांशीं लग्न करतें.' तुझ्यासारख्या सुविद्य मुलीला नानासाहेबांशीं लग्न करणं प्रशस्त वाटणार नाहीं; परंतु चंद्रिकाहि तुझ्याइतकीच सुविद्य आहे. बापाच्या अविचाराचं प्रायश्चित्त, वेळ आली कीं, मुलांनींच भोगायचं असतं. भाच्यांसारख्या इतर नातेवाईकांनीं नव्हे. भाऊसाहेबांची आजची मनःस्थिति लक्षांत न घेतां, आणि प्रस्तुतच्या प्रसंगीं आपलें कर्तव्य काय याची तिळमात्रहि जाणीव न बाळगतां तूं खुशाल दुसऱ्याशीं प्रणयाराधना करीत बसलीस. नलिनी, शिक्षणानं, स्वाभाविक सुसंस्कारांचं परिवधन व्हायचं कीं केवळ स्वार्थवृत्तींतच त्यांचं परिवर्तन व्हायचं! केवळ मी

आणि माझं सुख यापलीकडे तुझी दृष्टी जाऊं शकत नाहीं काय? स्वतःचं सुख, स्वतःच्या सुखांत नसून दुसऱ्याच्या सुखांत असतं. भाऊसाहेबांच्या किंचित् ढिल्या कारभाराला आणि सढळ स्वभावाला आतां दोष देण्यांत अर्थ नाहीं. निसर्गच, त्यांना त्याबद्दल शिक्षा करीत आहे. परंतु तुझ्या स्वार्थत्यागानें जर भाऊसाहेबांची शिक्षा टळत असली तर हा स्वार्थत्याग तूं कां करूं नये? हा स्वार्थत्याग तूं चंद्रिकेच्या माथीं कां मारतेस? चंद्रिकेची व तुझी मैत्री अशीच आहे का? तूं तुझ्या स्वार्थवृत्तीला अजून चिकटून आहेस! तुला मात्र तुझ्या मनाजोगता जोडीदार मिळाला कीं झालं; मग तुझ्या मैत्रीणीच्या जन्माचं मातेरं झालं तरी चालेल अशी तुझी विचारसरणी आहे. म्हणूनच मी पुनः म्हणतों कीं तुझ्या स्वार्थवृत्तीला धिक्कार असो!

**नलिनी**— ज्या स्वार्थवृत्तीचा तुम्ही माझ्यावर आरोप करतां, तोच आरोप मला तुमच्यावरहि करतां येईल. तुम्ही चंद्रिकेवर अनुरक्त आहांत. चंद्रिकेनं नानासाहेबांशीं लग्न केलं तर तुमच्या हातची चंद्रिका जाईल, या स्वार्थी जाणीवेनं तुम्ही मला नानासाहेबांशीं लग्न करावयास भाग पाडीत आहां असं मी कां म्हणूं नये?

**मंदार**—तोंड आहे तेव्हां वाटेल तें म्हणावं! नलिनी, सुखलोलुप— तेची तुझी दृष्टी इतकी कळसास जाऊन पोंचली आहे कीं दुसऱ्याच्या मनांतील किंवा कृतींतील उदात्त हेतूहि तूं स्थिर आणि स्वच्छ दृष्टीनं पाहूं शकत नाहींस. माझ्यावर तूं स्वार्थाचा आरोप करूं शकशील पण चंद्रिकेवर तुला असा आरोप खास करतां येणार नाहीं. नलिनी, तुझी अडचण मी दूर करतों. तूं जर नानासाहेबांशीं लग्न करशील, तर

मी चंद्रिकेशीं लग्न करणार नाहीं. मी तुला वचन देतों; हात कर पुढें. मी तुला वचन देतों.

**नलिनी**— काय ? तुम्ही चंद्रिकेशीं लग्न करणार नाहीं ?

**मंदार**— होय. तुला आतांच मी तसं वचन द्यावयास तयार आहें.

**नलिनी**— परंतु त्या वचनाची खात्री काय ? मी जरी नानासाहेबांशीं लग्न केलं तरी माझं लग्न झाल्यानंतर तुम्ही उभयतां विवाहबद्ध होऊं शकतां !

**मंदार**— दिलेलं वचन मोडण्याइतकी सगळ्यांचीच सुखलोलुपता कळसास जाऊन पोंचलेली नसते. असो. तुला जें सांगायचं तें मी सांगितलंच आहे. भाऊसाहेबांची मुलगी या नात्यानें, जें चंद्रिका करूं पहात आहे, तें तूंच करणं इष्ट आहे असं मी पुनः तुला सांगतों. तुलाच नानासाहेबांशीं लग्न केलं पाहिजे.

**नलिनी**— हा तर जुलुमाचा कळस आहे.

**मंदार**— आणि चंद्रिका तरी काय स्वतःच्या खुषीनं नानासाहेबांशीं लग्न लावायला तयार झाली आहे ?

**नलिनी**— चंद्रिका ! चांद्रिका ! मंदार, तुम्ही तिचे गोडवे खुशाल गा, पण तिच्या मूर्खपणामुळंच प्रस्तुतचं संकट आमच्यावर आलं आहे. राईचा पर्वत करून, भाऊसाहेबांच्या पुढील आयुष्याचं अवास्तव चित्र आपल्या मनाशीं रेखाटून आणि आपण कांहीं तरी उदात्त करतों आहों अशी चुकीची भावना स्वतःच्या मनाशीं करून घेऊन ती नानासाहेबांना वचन देऊन बसली. भाऊसाहेब वाडा जाऊं देण्यास तयार असतांना व त्याप्रमाणें त्यांनीं नानासाहेबांना स्वच्छ सांगितलं

असतांना, चंद्रिकेला, नानासाहेबांच्या घरीं जाऊन, त्यांना 'मी तुमच्याशीं लग्न करण्याला तयार आहें' असं सांगायचं काय प्रयोजन होतं? मी स्वत: अजून सांगतें कीं केवळ वाडा जाण्यापलीकडे आमचं नुकसान असं कांहीं होत नाहीं. आम्ही सर्व भाडयाच्या घरांत राहावयास तयार आहोंत. आज दुनियेंत भाडयाच्या घरांत राहणारे लोक कांहीं कमी नाहींत. चंद्रिकेला, आम्हांला दारिद्र्य येईल अशी भीति कां वाटावी? मीच भाऊसाहेबांची मुलगी आहे असं नानासाहेबांच्या कारकुनाला भासवतांना चंद्रिकेनं मला विचारलं होतं का? मग तुम्ही तरी चंद्रिकेची जबाबदारी माझ्यावर कां टाकतां? चंद्रिकेला तेवढी उदात्त भावना आणि मी मात्र सुखलोलुप? परंतु मूर्खपणानं कोणी स्वार्थत्याग करूं लागला तर, त्याच्या मूर्खपणाला उदात्त भावनेनं केलेला स्वार्थत्याग असं गोंडस नांव देऊन त्याचे देव्हारे माजविणारांपैकीं मी नाहीं. 'साप साप' म्हणून जमीन धोपटणाराचं 'अरे या धोपटणाऱ्याला किती कष्ट पडत आहेत' म्हणून जर कोणी कौतुक करूं लागला तर त्या कौतुक करणाराला शहाणपणाचं प्रशस्तिपत्र तुम्हीं द्याल काय? चंद्रिका ही आमच्याकडे वाढलेली अनाथ पोर म्हणूनच आम्ही तिच्या गळ्यांत ही जबाबदारी टाकतों असा युक्तिवाद तुम्ही कां करतां? ज्यांच्याकडे अनाथ मुली आहेत, त्या मुलींचे पालक त्यांना म्हाताऱ्यांच्या गळ्यांत अडकवून मोकळे होतात कीं काय? मी चंद्रिकेच्या उदात्त भावनेचं विडंबन करीत नाहीं. परंतु आपण कांहीं तरी फार उदात्त करीत आहों या भ्रामक कल्पनेच्या भरीं ती पडलेली आहे. मंदार, दुसऱ्यावर सुखलोलुपतेचा शिक्का बेजबाबदारपणानें मारण्यापूर्वी, आपण

खरोखरीच सुखाला अगदीं झिडकारून टाकलं आहे कीं काय, प्रत्यक्ष सुखच मूर्तिमंत पुढें उभं राहिलं असतां, त्याच्याकडेहि पाठ फिरवून उभं रहाण्याचं सामर्थ्य आपल्यामध्यें आहे कीं काय, याचा मनुष्यानं त्रिवार विचार केला पाहिजे. चंद्रिकेला नानासाहेबांशीं लग्न लावून स्वतःच्या आयुष्याचं मातेरं करून घ्यावयास कोणीच सांगत नाहीं. आयुष्याच्या सागरांतून सुखरूपपणानं पैलतीराला जाण्याकरतां, मनुष्याला भावनेच्या होडींत बसावं लागतं, पण त्या होडीला जर बुद्धीचं सुकाणू जोडलं नाहीं तर ती होडी भावनावशतेच्या खडकावर आपटून फुटून गेल्याखेरीज राहणार नाहीं. सारासार विचार, बुद्धीच करीत असते. भावना केव्हांहि सारासार विचार करीत नाहींत. मी सुखलोलुप असेन, पण चंद्रिकेला सुखविन्मुख व्हायला मी सांगत नाहीं. माझं प्रेम तुम्हांला स्वीकारायचं नसेल तर खुशाल स्वीकारूं नका; परंतु स्वतःच्या प्रेयसीची तरफदारी करण्याच्या भरांत माझ्यावर निरर्गलपणानें प्रहार करूं नका. त्या प्रहारांचा माझ्यावर कांहींच परिणाम होणार नाहीं.

**मंदार** — तुझ्या बुद्धिवादाचं मी कौतुकच करतों. परंतु चंद्रिकेच्या स्वार्थत्यागाची किंमत कमी करण्याचा तुझा जो प्रयत्न चालला आहे त्याची तर मला घृणाच वाटते. ती तुझ्यावर सद्बुद्धीनं उपकार करायला गेली तर तूं म्हणतेस कीं माझी भूमिका घेतांना तिनं मला विचारलं होतं का? गरीब बिचाऱ्या चंद्रिकेला, तिच्या सद्बुद्धीचं हें चांगलंच प्रायश्चित्त मिळत आहे म्हणायचं! नलिनी, कृतज्ञतेचा हा अभिनव प्रकार तुझ्यासारख्या सुशिक्षित मुलीला चांगलाच शोभून दिसतो यांत शंका नाहीं! नलिनी, मी तुला एकच प्रश्न विचारतों; चंद्रिकेनं नानासाहेबांकडे

जाऊन, त्यांच्याशीं लग्न करायचं अभिवचन दिलं ही गोष्ट तुला माहीत होती ना? तूं कधीं तरी खऱ्या वस्तुस्थितीचा आविष्कार नानासाहेबांच्या पुढें केलास का? भाऊसाहेबांची मुलगी मीच, चंद्रिकेवर हा केवळ अन्याय होत आहे, तुम्हांला तुमची लग्न करण्याची हौस भागवून घ्यायची असेल तर ती माझ्याशीं लग्न करून भागवा हें नानासाहेबांना जाऊन सांगण्याचं धैर्य तुला कां झालं नाहीं? सांग नलिनी, सांग, मामावरचं संकट टाळण्याकरतां, लोकाचाराचीहि पर्वा न करतां भाची, एका म्हाताऱ्याला मी तुमच्याशीं लग्न करायला तयार आहें असं बिन-दिक्कत सांगून येते आणि मुलगी—मुलगी स्वार्थवृत्तीनं खऱ्या प्रकाराचं गोपन करून माझ्याशीं बुद्धिवाद करीत बसते! नलिनी! कोणाचं चित्र यांत खुलून दिसतं? तूं स्वतःला बुद्धिवादी म्हणवतेस; पण अनि-रुद्धांनीं जी योजना तुझ्यापुढें मांडली होती त्या योजनेचा तूं धिक्कार कां केलास? अनिरुद्धांना इतकं एकदम झिडकारून टाकण्याचं तुला काय कारण होतं? नलिनी, हा अहंकार बरं, स्वतःच्या बुद्धिमत्तेचा अहंकार! विचार कर, नानासाहेबांचं एक असूं दे, पण अनिरुद्धांशीं लग्न करून तुला सर्वांवरचं संकट टाळतां येण्यासारखं आहे! नानासाहेब वृद्ध म्हणून तूं त्यांच्याशीं लग्न करणार नाहींस; परंतु अनिरुद्धाला इतकं झिडकारून टाकण्याइतकी तुझी तरी गुणवत्ता काय वायां चालली आहे! नलिनी, तूं अनिरुद्धाशीं तरी लग्न करायला तयार आहेस काय?

**नलिनी** (गोंधळून इकडे तिकडे पाहते. इतक्यांत "भाऊसाहेब आहेत का" अशी हांक बाहेरून ऐकूं येते.)

**मंदार**—कोण आलं बरं? आणि ते या खोलीकडे कां? भाऊ-साहेबांची खोली बंद आहे वाटतं?

**नलिनी** — (विरक्त स्वराने) उघडा तर खरं दार त्यांना.

**मंदार** — बरं तर! (जाऊन दार उघडतो. नानासाहेब व त्यांचा कारकून तोटक दृष्टीस पडतात) कोण आपण? या! आंत या.

**तोटक** — श्रीमंत, आपण चुकलों. हा कांहीं भाऊसाहेबांचा दिवाणखाना नव्हे!

**नाना०** — आं! काय म्हणतोस? मूर्खच आहेस! अरेरे, या मंडळींना आपण विनाकारण त्रास दिला. माफ करा हं, मिस्टर. मला भाऊसाहेबांची भेट घ्यायची होती.

**नलिनी** — आपण इथं बसलांत तरी हरकत नाहीं. ही माझीच अभ्यासाची खोली आहे. मी भाऊसाहेबांना येथेंच बोलावतें. आपलं कांहीं खाजगी काम असेल तर आम्ही बाहेर जातों.

**नाना०** — म्हटलं तर खाजगीच आहे. मला भाऊसाहेब आणि त्यांची मुलगी या उभयतांना भेटायचं आहे.

**नलिनी** — मीच भाऊसाहेबांची मुलगी नलिनी. मी नमस्कार करतें.

**नाना०** — आं! तुम्ही—तुम्ही भाऊसाहेबांची मुलगी! तोटक, हा काय प्रकार आहे? त्या दिवशीं पाहिलेली मुलगी ही नव्हे!

**तोटक** — हा खास फसवाफसवीचा प्रकार आहे. मला ज्या मुलीनं नमस्कार केला ती ही मुलगी नव्हे!

**नाना०** — भाऊसाहेबांनीं आमच्याशीं वंचना केली!

**तोटक** — (नानासाहेबांस एकीकडे) उगाच वाद कां! ही मुलगी-सुद्धां सुरेख आहे. आपल्याला काय, नगास नग असल्याशीं कारण! हीच मुलगी चांगली आहे.

**नाना०** — बरं, बरं! (उघड) असो; मी कांहीं उगाच ताणून धरणारा इसम नव्हे. नलिनी, त्या दिवशीं भाऊसाहेबांची मुलगी म्हणून दुसऱ्या एका मुलीनं माझ्याशीं लग्न करण्याचं कबूल केलं आहे. ही गोष्ट तुला कदाचित् माहित नसेल. त्या मुलीनं जें कबूल केलं तें जर तुला कबूल असेल तर——

**नलिनी** — इश्श! (कृत्रिम मुरकते.)

**मंदार** — (स्वगत) याचा अर्थ काय?

**तोटक** — (स्वगत) काय पण मुरकते आहे! उभ्या आयुष्यांत माझ्या बायकोनं एकदां सुद्धां असा मुरका मारला नाहीं. हं. चालायचंच! गरीबीच्या संसारांत कसले आले आहेत मुरके आणि कसले आले आहेत फिरके! गरीबांच्या बायका म्हणजे चुलीपुढें सारवायचं पोतेरंच!

**नाना०** — (स्वगत) मुरका पण मुरका! (उघड) काय समजूं मी या तुमच्या एकेरी शब्दाचा अर्थ!

**नलिनी** — थोडासा व्यवहाराचा प्रश्न आहे म्हणून मी स्पष्ट बोलूं कां?

**नाना०** — जरूर! जरूर! मला तें फार आवडेल.

**नलिनी** — आपल्याशीं लग्न करायला माझी मुळीच हरकत नाहीं. पण——

**नाना०** — काय म्हणतां! मग अडलं आहे कुठं? पण म्हणून थांबलांत कां! तुमच्या साऱ्या शंका मी निवारण करायला तयार आहें——

**नलिनी** — तुम्ही माझ्या वडीलांना पन्नासहजार रुपये दिलेले आहेत. मी जर तुमच्याशीं लग्न केलं तर तुम्ही हें सारं कर्ज सोडून

द्यायला तयार आहांत! पण, तसं न केलं तर तुम्ही हा वाडा विक्री करून घेणार, असं माझ्या कानावर आलं आहे; मी म्हणतें हें खरं आहे ना?

**नाना०**—अगदीं बराबर! यांत कांहीं चूक नाहीं.

**नलिनी**—मी भाऊसाहेबांची मुलगी. त्यांच्यावर आलेलं संकट मलाच दूर केलं पाहिजे.

**तोटक**—योग्य! योग्य! फारच छान!

**नाना०**—तुमची कर्तव्यदक्षता पाहून मला फार आनंद होतो. परंतु तुमची शंका अजून तुम्ही मला सांगितली नाहीं!

**नलिनी**—शंका म्हणण्यापेक्षां अट आहे. आणि ती अट आपण पुरी केली पाहिजे.

**नाना०**—जरूर करूं!

**तोटक**—अलबत्! लग्नाचं वचन कायम आहेना पण!

**नलिनी**—होय! मी मघांशींच सांगितलं कीं, मी तुमच्याशीं लग्न लावायला तयार आहें. माझी अट इतकीच कीं ज्या प्रॉमिसरी नोटवर तुम्ही भाऊसाहेबांना ५०००० रुपये दिले आहेत ती मला एकदां पाहिली पाहिजे. व्यवहाराचा प्रश्न आहे हा!

**नाना०**—पण ती प्रॉमिसरी नोट पाहून तुम्हांला काय करायचं आहे!

**नलिनी**—मग तुम्हांला तरी या वयांत लग्न करून काय करायचं आहे! ऐका, नानासाहेब, मी कांहीं वाटेवर पडलें नाहीं; केवळ भाऊ-साहेबांचं संकट दूर व्हावं म्हणून मी तुमच्याबरोबर लग्न लावण्यास प्रवृत्त झाल्यें आहे. मला ती प्रॉमिसरी नोट पाहिलीच पाहिजे!

**नाना०**—ही अट जरा विलक्षणच आहे!

**नलिनी**—नसेल पटत तर सोडून द्या! मग जें काय व्हायचं असेल तें होईल!

**नाना०**—म्हणजे काय? तुम्ही माझ्याशीं लग्न—

**नलिनी**—व्यवहार आहे हा! यांत परस्परांनीं तडजोड केलीच पाहिज. माझ्या मनाच्या समाधानासाठीं त्या प्रॉमिसरींत काय लिहिलं आहे तें मला पाहलं नको? ज्या प्रॉमिसरीमुळें मला आपल्याशीं जन्मभर जखडून घेण्याचा प्रसंग आलेला आहे ती प्रॉमिसरी मला एकदां नजरेखालून घातलीच पाहिजे. विश्वास वाटत नसेल तर सोडून द्या सारं. तुमचा मार्ग तुम्हांला मोकळा आहे. उगाच वेळ घालविण्यांत अर्थ नाहीं.

**तोटक**—(नानासाहेबांस, एकीकडे) पाहूं द्या एकदां तिला ती प्रॉमिसरी नोट! पोरीची जात! ती काय करणार आहे त्या प्रॉमिसरीचं! बोलून चालून बायको!

**नाना०**—बरं बुवा! एका अर्थानं तुमचं म्हणणं कांहीं खोटं नाहीं! (आंतल्या खिशांतून प्रॉमिसरी नोट काढतो) ही घ्या प्रॉमिसरी नोट. अगदीं नीट वाचून पहा. माझी कांहीं हरकत नाहा. (तोटकास, एकीकडे) तोटक्या! फटाकडी आहे बरं कां!

**तोटक**—(एकीकडे) म्हणूनच थोडंसं तिच्या कलानं घ्या. बायको होणार आहे ना ती?

(नलिनी प्रॉमिसरी नोट वाचण्याचा आविर्भाव करते. इतक्यांत भाऊसाहेब येतात.)

**भाऊ०** — कोण नानासाहेब! ठीक! वाड्याचं खरेदीपत्र लिहून घेण्यासाठीं आलां असाल?

**नाना०** — (हंसून) ती गोष्ट आतां बोलूंच नका. पण तुम्ही मात्र आमच्याशीं एक कपट केलं आहे! तुमची मुलगी (नलिनीकडे बोट दाखवून) ही ना?

**भाऊ०** — होय, चंद्रिकेनं, नलिनीच्या आयुष्याचं नुकसान होऊं नये म्हणून आपल्या कारकुनासमोर, मींच नलिनी असं भासविलं. तें कपट तर खरंच, पण त्याला आतां विशेष महत्व नाहीं. नानासाहेब, वाड्याचं खरेदीपत्र लिहून घेण्याची तजवीज करा. उगाच हा अप्रिय प्रसंग अधिक लांबविण्यांत अर्थ नाहीं.

**नाना०** — खरेदीपत्राची आतां गोष्टच बोलूं नका.

**भाऊ०** — याचा अर्थ काय?

**नाना०** — याचा अर्थ असा कीं तुमच्या मुलीनं—नलिनीनं आतांच आमच्याशीं लग्न करण्याचं अभिवचन दिलं आहे.

**भाऊ०** — कुणी? नलिनीनं! नलिनी हें खरं आहे काय? चंद्रिकेचं वेड तुझ्या डोक्यांत शिरलं वाटतं? छे: मला तर आतां वेडच लागण्याची वेळ आली आहे! नलिनी! मला न विचारतां असलं वेडंवाकडं अभिवचन देण्याचं साहस तूं कां केलंस? नाहीं, असली गोष्ट मी होऊं देणार नाहीं! नानासाहेब वाड्याचं खरेदीपत्र लिहून घेऊन हा सर्व व्यवहार आटोपून टाका. अजाण मुलीच्या अभिवचनावर भरंवसा ठेवूं नका!

**नलिनी०** — (एकदम उठून) खरोखरच भरंवसा ठेवूं नका!

नाना० } आं! म्हणजे काय! याचा अर्थ काय?
तोटक }

**नलिनी०** —( त्वेषानें ) नानासाहेब, ही आपली प्रॉमिसरी नोट ना? (एकदम फाडून तुकडे करते) मंदार, ते तुकडे उचला आणि शेगडींत नेऊन टाका! जा! नानासाहेब जा आतां तुम्ही! ज्या प्रॉमिसरी नोटच्या आधारावर तुम्ही आमचा नाहक छळ केलात तिचं योग्य ठिकाण मी तिला दाखवलं. जा! मी किंवा चंद्रिका, कोणाशींही तुम्हांला आतां लग्न लावतां येणार नाहीं. मित्राची मुलगी, ही स्वतःच्या मुलीसारखी मानावयाची सोडून, उलट कर्जाऊ दिलेल्या पैशाच्या मोबदल्यांत तिचा तुम्ही अभिलाष धरलात! खोट्याच्या कपाळीं गोटाच हाणला पाहिजे! आम्ही वाड्यांतून निघत नाहीं व तुमचं लग्न होत नाहीं.

**नाना०** — विश्वासघात! विश्वासघात! मी याबद्दल तुम्हां दोघांवरहि फ़ौजदारी करीन! तोटक तूं साक्षी आहेस! आणि तुम्ही कोण! तुम्हीही साक्ष दिली पाहिजे.

**मंदार** — मी केवळ यांच्याकडे पाहुणा आहे. संबंध काय तुमचा व माझा? मी मुळींच या भानगडींत पडत नाहीं.

**नाना०** — हरकत नाहीं! माझा कारकून साक्ष आहे.

**मंदार** — उंदराला साक्ष मांजर! कोर्ट असल्या साक्षीला थोडंच विचारणार?

**नाना०** — काय करूं रे! पण हरकत नाहीं. मी फौजदारी दाखल करणारच. भाऊसाहेब, याचा जबाब तुम्हांला—

**नलिनी** — कोणालाच जबाब द्यावा लागणार नाहीं! तुम्हांला काय करायचं असेल तें खुशाल करा.

**भाऊ०** — नलिनी—

**नाना०** — भाऊसाहेब, ! प्रॉमिसरी नोट फाडली गेली म्हणून काय झालं ? या वाड्याचे कागदपत्र माझ्यापाशींच आहेत हें तुमच्या लक्षांत आहे ना ?

**मंदार** — काय ? भाऊसाहेब, हें खरं आहे काय ?

**भाऊ०** —होय, ही गोष्ट खरी आहे. नलिनी तूं हें फुकट संकट ओढवून घेतलंस ! नानासाहेब, इच्छाच असेल तर आपण फौजदारी करा, पण मी अजूनहि खरेदीखत देण्यास तयार आहें.

**तोटक** — नानासाहेब ! चला ! आपण या गोष्टीचा जरा विचार करूं. चला लवकर.

(चंद्रिका प्रवेश करते.)

**चंद्रिका** — थांबा, नानासाहेब थांबा, कोणावर तुम्ही फौजदारी करणार आहां ? मी सारं ऐकत होत्यें. तुम्हांला दिलेलं वचन मी अजून मोडलं नाहीं.

**भाऊ०** — चंद्रिके—

**चंद्रिका** — शांत व्हा, भाऊसाहेब. नानासाहेब, तुम्हांला दिलेलं वचन मी अजून मोडलं नाहीं. भाऊसाहेबांवर तुम्ही फौजदारी करूं शकत नाहीं.

**नाना०** — (तोटकास) आली पुनः पंचाईत.

**तोटक** — (नानासाहेबांस) आठ पंधरा दिवसांची मुदत द्या आणि चला आतां.

**नाना०** — चंद्रिके, तूं अजून माझ्याशीं लग्न करावयास तयार आहेस का?

**चंद्रिका**— नानासाहेब—

**नलिनी** — चंद्रिके, मागे हो! तुला मी एक अक्षर बोलूं देणार नाहीं. नानासाहेब, तुम्हांला तुमचे पैसे मिळाले म्हणजे झालं ना!

**नाना०** — होय. जवळजवळ असंच.

**नलिनी** — कां, जवळजवळ असंच कां? तुम्हांला तुमच्या मित्राच्या मुलीहि हव्या आहेत वाटतं! खरं सांगा! तुम्हांला तुमचे पैसे मिळाले म्हणजे झालं ना!

**नाना०** —होय! होय!

**नलिनी** — आजपासून तीन दिवसांच्या आंत तुम्हांला तुमचे पैसे मिळतील! इतक्यावरहि तुम्हांला फौजदारी करायची असेल तर खुशाल करा!

**नाना०** — तीन दिवसांत! वेडे मुली! कांहीं तरी काय बोलतेस! तीन दिवसांत काय एखाद्या झाडाला पैसे लागणार आहेत वाटतं! ही थापाथापी आतां पुरे. मला आतां फौजदारी केलीच पाहिजे.

**नलिनी** — पैसे मिळाले तरी!

**नाना०** — तीन दिवसांत पैसे मिळणं अशक्य आहे!

**नलिनी** —जरूर मिळतील. तुम्हांला तीन दिवसांत पैसे मिळतील. आम्हांला मग एकदां पावती द्या आणि मोकळे व्हा.

**नाना०** — ठीक आहे. तीन दिवसांच्या आंत रक्कम आली नाहीं तर मात्र मी फौजदारी केल्यावांचून राहणार नाहीं. नमस्कार भाऊसाहेब!

(तोटक व नानासाहेब जातात.)

**भाऊ०** —नलिनी—

**नलिनी** — मला वेळ नाहीं. अनिरुद्ध कुठं आहेत? मला त्यांची ताबडतोब गांठ घेतली पाहिजे. (जाते.)

(पडदा पडतो.)

**अंक ४ था समाप्त**



## अंक ५ वा

(भाऊसाहेबांचा दिवाणखाना. नलिनी व चंद्रिका प्रवेश करतात.)

**चंद्रिका**—नलिनी! कां, तूं अशी घाबरल्यासारखी कां दिसतेस?

**नलिनी**— मी घाबरल्यें नाहीं. पण मला तुझा राग आला आहे. तूं माझ्याशीं वंचना करीत होतीस. मंदारांवर तुझें प्रेम अगोदरच बसलं असतांना तें तूं माझ्यापासून छपवून ठेवीत होतीस.

**चंद्रिका**— तुझं म्हणणं खरं आहे. पण ही गोष्ट तुला सांगावी असं प्रामाणिकपणानंच मला वाटलं नाहीं.

**नलिनी**— चंद्रिके, तूं स्वतःची वंचना करते आहेस आणि माझंहि नुकसान करीत आहेस. चंद्रिके, नानासाहेबांशीं लग्न करण्याचं कबूल करून तूं स्वतःची वंचना करीत होतीस, असेंच मी म्हणतें. नानासाहेबांनीं वाडा कदाचित् खरेदी केला असता, कदाचित् आपल्याला गरिबीही आली असती, परंतु त्या गरिबीच्या जिण्यांत तुझं व माझं मन खुलं राहिलं असतं. तुला मंदारांशीं लग्न करतां आलं असतं. चंद्रिके, मनाचा कोंडमारा करून तूं नानासाहेबांशीं लग्न लावायला तयार झालीस म्हणून तूं स्वार्थत्यागी वृत्तीची आणि मी ती गोष्ट करण्याचं नाकारीत होत्यें म्हणून मी स्वार्थवृत्तीची असं मंदारांनीं ठरविलं.

**चंद्रिका**— नलिनी, तूं स्वार्थवृत्तीची आहेस असं मला केव्हांहि वाटलं नाहीं, इतकंच नव्हे तर तूं नानासाहेबांशीं लग्न करावस असं मी

तुला कदापि सांगणार नाहीं. माझा स्वार्थत्याग म्हणजे तुला भ्रम वाटतो. तसंहि असेल कदाचित्. नलिनी, तारुण्यसुलभ आकांक्षा, नैसर्गिक मनोविनोदन, किंवा आमोदप्रमोद यांचा लाभ नानासाहेबांच्या सहवासांत मुळींच होणार नाहीं याची जाणीव मला आहे. विषाचा पेला अमृत म्हणूनच मानण्याचं ठरविल्यावर विषाला विष म्हणून संबोधण्यांत अर्थ काय? मामांच्या व तुझ्या सुखाच्या दृष्टीनं मला जें करावसं वाटलं तें मी केलं; आणि जें मी करणार आहें त्याची आवश्यकता आतां तर तीव्रतेनं वाढली आहे.

**नलिनी**— मी प्रॉमिसरी नोट फाडली या गोष्टीला अनुलक्षून तूं हें बोलत आहेस. परंतु चंद्रिके, तुझा वेडा हट्ट तूं जर सोडला असतास तर ती नोट तरी फाडण्याचा प्रसंग कशाला आला असता? पण जाऊं दे हें सारं. अनिरुद्ध कुठं आहेत हें तुला ठाऊक आहे कां?

**चंद्रिका**—कां बरं? अनिरुद्धांना तुला भेटण्याची इतकी कां घाई झाली आहे? तूं नानासाहेबांना वचन दिलं आहेस म्हणून—

**नलिनी**—तुझा तर्क अगदीं बरोबर आहे. अनिरुद्ध श्रीमंत आहेत, त्यांनीं जर पन्नासहजार रुपये दिले तर बरंच झालं नाहींतर—

**चंद्रिका**—नलिनी तूं जितकी उतावळी तितकीच भोळी आहेस. अनिरुद्ध झाले म्हणून कां पन्नासहजार रुपये एकदम द्यायला तयार होतील?

**नलिनी**— कां बरं? मी त्यांची विनवणी करीन, आर्जवं करीन आणि त्यांना पैसे द्यायला लावीन. मी भाऊसाहेबांवरचं संकट टाळीनच.

**चंद्रिका**—नलिनी, पण हें मुळींच करायची जरूर नाहीं. भाऊसाहेबांवरची फौजदारी मी अजून टाळूं शकतें. तूं कशाला अनिरुद्धांची मनधरणी करण्याच्या भानगडींत पडतेस!

**नलिनी**— अनिरुद्ध एकदां पन्नासहजार रुपये देण्यास तयार झाले होते.

**चंद्रिका**— पण तूं त्यांच्याशीं लग्न करायला तयार आहेस कां! त्यांच्यावर तुझं प्रेम आहे कां?

**नलिनी**—मनाविरुद्ध, भाऊसाहेबांवरचं संकट टाळावं म्हणून तूं नानासाहेबांशीं लग्न लावायला तयार झाली आहेस; मीहि भाऊसाहेबांवरचं संकट टळावं म्हणून मनाविरुद्ध अनिरुद्धांशीं लग्न लावायला तयार होणार आहें. अनिरुद्धांवर माझं प्रेम आहे कीं नाहीं हें विचार करायला मला आतां वेळच नाहीं.

**चंद्रिका**—अनिरुद्धांचं मन वळवणं हा मार्ग खात्रीचा नाहीं. नलिनी तूं स्वस्थ रहा, नानासाहेब अजूनहि माझ्याशीं विवाहबद्ध होतील याविषयीं खात्री बाळग. कां उगाच अनिरुद्धांच्या पायधरण्या करण्याच्या भानगडींत पडतेस?

**नलिनी**— तुझा जसा हट्ट तसा माझाही हट्टच म्हणेनास.

**चंद्रिका**—पण तूं तो सोडावास हें बरं नाहीं कां! नको, नलिनी, नको; पुरे झाल्या त्या आतां एकेकाच्या पायधरण्या! तूं अगदीं स्वस्थ रहा.

**नलिनी**— जे तूं करायला पहात आहेस तेंच मी करूं पहात आहे; मी अनिरुद्धांची गांठ घेणारच.

**चंद्रिका** — बरं तर. इच्छा तुझी. मी नाहीं कशाला म्हणूं? अग पण हे पहा अनिरुद्धच इकडे येत आहेत (अनिरुद्ध येतो). अनिरुद्ध, नलिनी तुमची केव्हांपासून वाट पहाते आहे. तिला तुमच्याशीं कांहीं बोलायचं आहे.

**अनिरुद्ध** — असं! ठीक, मी ऐकायला तयार आहें.

**चंद्रिका** — नलिनी, बोल बाई आतां. मी जात्यें. (जाते)

**नलिनी** — अनिरुद्ध, तुम्ही आमच्या लायब्ररींत वाचीत बसलां होतां वाटतं!

**अनिरुद्ध** — होय. पण कंटाळा आला लवकरच. शेवटीं इकडे आलों झालं.

**नलिनी** — आणि मंदार?

**अनिरुद्ध** — मंदार कसलंसं वेदांताचं पुस्तक वाचीत बसले आहेत! आपल्याला नको ती भानगड! आपण तर असलीं पुस्तकं हातांत सुद्धां धरीत नाहीं. फायदा काय असली पुस्तकं हातांत धरण्यापासून! त्यापेक्षां एखादी डिटेक्टिव्ह थ्रिलर वाचणं आपल्याला पसंत आहे बुवा!

**नलिनी** — तुम्हांला रोमान्स आवडत नाहीं वाटतं?

**अनिरुद्ध** —रोमान्स आवडतो, पण तो प्रत्यक्ष करायला! रोमान्स आणि वेदांत नुसता वाचून फायदा काय? दोन्हीं प्रत्यक्ष आचरणांत आणावीं लागतात. पण तूं इतकी अस्थिर कां दिसतेस?

**नलिनी** — तुम्हांला झालेला प्रकार समजला असेलच.

**अनिरुद्ध**—मला मंदारानीं सगळं सांगितलं दोन दिवसांपूर्वीच! हो! तूं दिलेली मुदत आज सरते आहे. अगदीं कांटेतोल पहायचं म्हणजे आज रात्रीं १२ वाजतां सरते. हं! मग सांग तुझी पैशाची तजवीज झाली कां?

**नलिनी**—आज दोन दिवस मी सारखा विचार करते आहें तुमच्यापाशीं या प्रकारासंबंधीं बोलावं म्हणून; पण धीरच होईना. आज मात्र निश्चय केला कीं तुमच्याजवळ आतां बोलायचंच; अनिरुद्ध, माझी विनंति तुम्ही ऐकाल का?

**अनिरुद्ध**—जरूर! कां नाहीं ऐकणार? बोल लवकर.

**नलिनी**—मी आवेशाच्या भरांत प्रॉमिसरी नोट फाडली; भाऊ-साहेबांनीं वाडयाचे कागदपत्र नानासाहेबांजवळ दिले आहेत ही मला कल्पना नव्हती. त्यामुळं भाऊसाहेबांवर आतां नसतं संकट ओढवणार आहे. याप्रसंगीं तुम्ही जर सहाय्य केलं नाहीं तर—

**अनिरुद्ध**—मी काय करावं असं तुझं म्हणणं आहे.

**नलिनी**—दोन दिवसांपूर्वीं तुम्हीं काय म्हणाला होतां! पन्नास हजार रुपये देऊन तुम्ही माझ्याशीं लग्न लावायला तयार झालां होतां! अजूनहि तुम्ही त्या गोष्टीला तयार आहांत कां?

**अनिरुद्ध**—(गंभीर चेहरा करून बसतो.)

**नलिनी**—कां? इतके एकदम गंभीर का झालांत? बोला ना?

**अनिरुद्ध**—हं. मी तुझे त्या वेळचे शब्द आठवतो आहे! काय बरं ते! 'तुम्ही माझं प्रेम पैशानं विकत घेऊं पहातां? मला तुमच्याशीं लग्न करतां येणार नाहीं' हेच ते तुझे शब्द! तूं मला चारचौघांच्या

देखत झिडकारून टाकलंस. तेव्हांच माझी मागणी मान्य केली असतीस तर हा प्रसंग कां ओढवला असता? नलिनी, तुझ्या प्रश्नाला उत्तर देण्यापूर्वीं माझ्या एका प्रश्नाचं उत्तर तूं दिलं पाहिजेस. अग, तुझं खरं प्रेम आहे तरी कोणावर! मंदारांवर कीं माझ्यावर! माझ्यावर तर असणं शक्यच नाहीं म्हणा!

**नलिनी** — अनिरुद्ध, मी तुमच्या सहाय्याची याचना करीत आहें. तुमच्याकडून असले प्रश्न येतील असं मला वाटलंच होतं. मंदारांजवळ मी प्रेमयाचना केली होती ही गोष्ट खरी; परंतु त्यांनीं मला झिडकारलं!

**अनिरुद्ध** — आणि मी इथं आल्यापासून तुझी प्रेमयाचना करतों तर तूं एकदां सुद्धां प्रेमाचा शब्द बोलली नाहींस! इतकंच नव्हे तर मला जो मार्ग योग्य वाटला, त्या मार्गानं जाऊन तुझ्यावरचं संकट टाळण्याचा मी प्रयत्न केला तर मला अगदीं फणकाऱ्यानं उडवून दिलंस! नलिनी, बायकांच्या जातीनं इतकं नाक वर करून चालूं नये; नाहीं तर असा खालीं मान घालण्याचा प्रसंग येतो.

**नलिनी** — तुम्हांला आतां माझ्या मर्मावर घाव घालण्याचा हक्कच आहे. पण ही वेळ तरी आहे का असं बोलण्याची! सांगा! अनिरुद्ध, सांगा माझी विनंति तुम्ही मान्य करणार ना?

**अनिरुद्ध** — कठीण आहे.

**नलिनी** — कां बरं! तुम्ही तर माझ्यावर प्रेम करीत होतां!

**अनिरुद्ध** — पण तूं कुठं माझ्यावर प्रेम करीत होतीस? त्यामुळं मला माझं प्रेम निराशेच्या बाटलींत भरून वर निरुत्साहाचं बूच लावावं

लागलं! आतां तूंच सांग, माझ्यावर तुझं प्रेम नसेल तर तूं तरी माझ्याशीं लग्न करण्यांत अर्थ काय? प्रेमावांचून लग्न म्हणजे साखर घातल्या-वांचून केलेला चहा! आणि त्यांतून एकतर्फी प्रेम तर फारच वाईट! एक वेळ, नवराबायकोचं एकमेकांवर मुळींच प्रेम नसलेलं पत्करलं पण एकानं प्रेम करायचं आणि दुसऱ्यानं प्रेमच करायचं नाहीं ही स्थिति फार वाईट. प्रेमांतसुद्धां प्रतियोगी सहकारिता लागते. मी पहिल्या-पासूनच प्रतिसहकारवादी आहे!

**नलिनी**—थट्टा बरी सुचते तुम्हांला! माझा जीव प्रत्येक क्षणीं खालीं वर होत आहे. मी मोठ्या आशेनं तुमच्याकडे आल्यें आणि तुम्ही तर माझी चेष्टा चालविली आहे!

**अनिरुद्ध**—पण तूं माझ्या प्रश्नाचं उत्तर कां देत नाहींस? नलिनी, तीन दिवसांत तूं माझ्यावर प्रेम करायला लागलीस वाटतं? तसं जर असेल तर प्रत्येक तरुण मुलीला एक धडा तरी मिळेल कीं प्रेमाचा पाझर फुटायला तीन दिवस पुरतात! नलिनी, सांग, तूं माझ्यावर खरंच प्रेम करीत आहेस असं मी समजूं का? समज, मी तुझ्या म्हणण्याप्रमाणं तुला सहाय्य केलं, तुमचं संकट टळलं, आणि तूं माझ्याशीं लग्न केलंस; पण तुझं जर माझ्यावर प्रेमच नसेल तर त्या लग्नाचा उपयोग काय! तुमची वेळ निघून जाईल; पण मी पुनः समुद्रांत राहून कोरडाच! आज तूं संकटाच्या भीतीमुळें माझ्याशीं लग्न करण्याला उद्युक्त झाली आहेस. तें संकट निघून गेलं कीं तुझ्या या भावनेची तीव्रता कमी होणारच! लग्नाची बायको घरांत आल्यावर, पुनः प्रेम करायला दुसरी बाई धुंडीत बसायचं हें आपल्याच्यानं होणार नाहीं!

मी व्यापारी मनुष्य! प्रेमाचं भांडवल गुंतवतांना मला फार बारीक विचार हा केलाच पाहिजे. भांडवल भलतीकडेच गुंतलं तर नवराबायकोंच्या लिमिटेड कंपनीचं दिवाळं निघायला उशीर काय ? आणि नलिनी, या लिमिटेड कंपनीचे शेअरहोल्डर्स कोण म्हणून विचारशील तर पुढें होणारीं बछडीं !

**नलिनी**—तुम्ही मला विचारतां कीं तुझं माझ्यावर प्रेम कुठं आहे ! पण मीहि तुम्हांला उलट प्रश्न विचारतें कीं माझं तुमच्यावर प्रेम नाहीं अशी तुमची समजूत व्हायला कारणं तरी काय झालीं ?

**अनिरुद्ध**—म्हणजे काय बुवा ! तुझ्या एकंदर वर्तणुकीवरून मी तो कयास बांधला. शिवाय तूं मंदारांजवळ प्रेमयाचना केली होतीस! आतां तूं जर प्रेमाचे प्रयोग करून पहात होतीस असं म्हणायचं असेल तर गोष्ट वेगळी !

**नलिनी**— प्रेमाचे प्रयोग करून आयुष्याची रसायनशाळा मला करायची नाहीं. माझं म्हणणं इतकंच कीं, तुमच्या प्रेमयाचनेकडे दुर्लक्ष करायला त्यावेळीं तशीच कारणं झालीं होतीं. वस्तुत: मंदारांनीं मला वाचवलं असतांना, तुम्ही मला 'मीच तुला वाचवलं' असं खोटंच सांगितलं; यामुळें तुमच्याबद्दल माझ्या मनांत एक प्रकारची अढी बसली. त्यानंतर, चंद्रिकेच्या दृष्टीस साप पडला असतांना, मंदारांनीं त्याला पुढें सरसावून ठार केलं आणि तुम्ही मात्र काठी शोधण्याचं निमित्त करून घरांत गेलांत! अनिरुद्ध, बायका, पुरुषांपासून मर्दपणाची अपेक्षा करीत असतात; नाजूक नखरेलपणाची नव्हे.

**अनिरुद्ध**— अगदीं कबूल. पण नलिनी, तूं स्वत:च्या बेशुद्धींत स्वत:चा गैरसमज करून घेतलास, त्याला मी काय करूं? वस्तुत: 'तुला आज एका तरुण गृहस्थानं वाचवलं' असंच मी तुला सांगितलं आणि त्या तरुण गृहस्थाचा अभिप्रेत आशय मंदार असाच होता. तूं गैरसमजुतीनं तुला वाचविणारा मीच अशी खोटी समजूत करून घेतलीस व नंतर मी खोटी बढाई मारणारा अशी माझी निंदा करण्यास सुरवात केलीस. सापाला मारण्याच्या बाबतींतहि असंच म्हणतां येईल. त्यावेळीं मजजवळ काठी नसल्यामुळं मी काठी शोधण्यासाठीं इकडे तिकडे धांवाधांव केली यांत चुकलं कुठं? बोल नलिनी, माझा खुलासा तुला पटतो ना? बरं, माझ्या अंगीं इतके दोष असतांना तूं माझ्याशीं लग्न करायला कां धडपडतेस?

**नलिनी**— अनिरुद्ध, तुमच्यावरचे आरोप मी मागे घेत्यें! गैरसमजूत झाली माझी! आतां तरी माझी विनंति तुम्ही मान्य करणार ना?

**अनिरुद्ध**— नलिनी, आतां उपयोग काय? या लटपटी आतां फुकट आहेत. आज तुला एका विशिष्ट गोष्टीची गरज आहे म्हणून तूं आतां ही प्रेमाची भाषा बोलत आहेस. तुझं मंदारांवरचं प्रेमच माझ्या-संबंधीं औदासिन्य सिद्ध करते.

**नलिनी**— अनिरुद्ध, मनुष्याला सारे सद्विचार अगदीं एकाच क्षणांत सुचले असते तर आयुष्यांत त्याच्या हातून चुका झाल्याच नसत्या. मंदारांजवळ मी प्रेमयाचना केली पण आम्हां उभयतांना असं कळून आलं कीं आम्ही कांहीं एकमेकांना योग्य नाहीं. मग मी त्यांचा नाद सोडला यांत चुकलं कुठं? तुम्ही म्हणतां मला एका विशिष्ट

गोष्टीची गरज आहे; पण पन्नास हजार रुपये देऊन तुम्हीच माझ्याशीं लग्न लावायला तयार झालां होतां. मी त्यावेळेला तुम्हांला झिडकारलं म्हणून तुम्हांला राग आला. आज तींच गोष्ट मी बोलतें आहे म्हणून तुम्ही मला झिडकारून टाकीत आहां. अनिरुद्ध, घटकाभर असंच समजा कीं, मला तुमचे पैसे हवे आहेत आणि म्हणूनच मी तुमच्याशीं लग्न करायला तयार आहें.

**अनिरुद्ध**—पण तसल्या लग्नांत अर्थ काय? तुझं प्रेम नसेल तर आपण असल्या बिनप्रेमाच्या लग्नाच्या भानगडींत पडणार नाहीं. लग्नाची एक बायको आणि प्रेमाची दुसरी बायको, असली द्विदलपद्धति आपल्याला जुळणार नाहीं. हल्लीं दोन बायका करण्याची पद्धति निघाली आहे. पण तींत होतं काय कीं एकीचा कंटाळा आला कीं फार वर्षांनीं दुसरी करावीशी वाटते. पण मी तुझ्याशीं लग्न केल्यानंतर, थोड्याच दिवसांनीं मला दुसरी बायको करावी लागली तर कांहीं वर्षांनीं मला तुम्हां दोघींचाहि कंटाळा येईल आणि पुनः मला तिसरी बायको करावी लागेल. छे, हें आपल्याच्यानं जमायचं नाहीं. असल्या आवर्त दशांश पद्धतीनं लग्नावर लग्नं करून घेण्याची आपली बिलकुल इच्छा नाहीं. पुरुष म्हणजे काय गणितांतला आंकडा आहे वाटतं कीं त्याच्या मागें खुशाल एकामागून एक बायकोचे बिंदु चिकटावे? छट्, असला अंकबिंदु न्याय आपल्याला मुळींच पसंत नाहीं.

**नलिनी**—अनिरुद्ध, असल्या प्रसंगीं तुम्हांला थट्टा सुचावी हें माझें दुर्दैव; तें असो, तुम्ही माझ्या प्रश्नाचं काय उत्तर देतां?

**अनिरुद्ध**—मी तुझ्या प्रश्नाचं उत्तर नकारार्थीच देऊं शकतों. कारण, एकतर माझ्यावर कांहीं तुझं खरं प्रेम नाहीं—

**नलिनी**—अहो, पण तुमचें तरी माझ्यावर, तुम्ही मला पहायला आलां तेव्हां, प्रेम होतं असं तुमचं म्हणणं आहे काय? प्रथमदर्शनींच नसलं तरी, सहवासानं प्रेम उत्पन्न होऊं शकत नाहीं काय? दोन मित्रांमध्येंसुद्धां, ते अपरिचित असतांना सहवासानेंच प्रेम उत्पन्न होऊं शकतें. जगांतलीं सारींच लग्नें कांहीं love at first sight नें होतात थोडींच? सहवासानेंच प्रेम उत्पन्न होतें व त्याचें सातत्यहि अधिक असतें. लग्न झाल्यानंतर आपणा उभयतांमध्यें असें प्रेम उत्पन्न होणार नाहीं कशावरून? बोला अनिरुद्ध, माझी विनंति मान्य करणार ना?

**अनिरुद्ध**—मी तुझी विनंति मान्य नाहीं केली तर?

**नलिनी**—तर मग मला माझा मार्ग मोकळा आहे. या जगाला माझं हें तोंड दिसणार नाहीं अशी कांहीं तरी तजवीज मला केली पाहिजे.

**अनिरुद्ध**—म्हणजे तूं आत्महत्या करणार कीं काय? छे छे, असं कांहीं करूं नको. तूं आत्महत्या केल्यानं भाऊसाहेबांवरचं संकट थोडंच टळणार आहे?

**नलिनी**—त्याचं तुम्हाला काय सुवेरसुतक? तुमचा नकार कायम आहे ना? मग उगाच कां माझा वेळ घेतां? मला जाऊं द्या.

**अनिरुद्ध**—म्हणजे तूं अगदीं जीव द्यायला निघालीस कीं काय? जीव देण्याच्या कामांत बायका अगदीं मागेंपुढें पहात नाहींत! जीव द्यायला अगदीं एका पायावर तयार असतात! आजपर्यंत झालेल्या आत्महत्यांत, बायकांनीं केलेल्या आत्महत्यांची संख्या अधिक असेल. पण नलिनी जीव देतांनासुद्धां मागचा पुढचा विचार करावा!

**नलिनी**—माझ्या जीवाबद्दल आतां कां तुम्हांला हळहळ वाटते?

तुम्हांला जर सहाय्य करायचं नाहीं तर माझ्या जिवाचीहि काळजी करण्याची तुम्हांला जरूर नाहीं. एकूण, मला आतां एकच मार्ग शिल्लक आहे. जी गोष्ट मी आतांपर्यंत टाळीत होत्यें तीच मला केली पाहिजे.

**अनिरुद्ध** — म्हणजे तूं नानासाहेबांशीं लग्न करणार कीं काय? हें पहा, आतां नानासाहेब या गोष्टीला कबूल होतील असं मला वाटत नाहीं.

**नलिनी** — आतां तुम्ही बोलूं नका. नानासाहेब कबूल होतील अशी मला खात्री आहे. आज ते आल्यावांचून रहाणार नाहींत. त्या दिवशीं ते इथून चिडून निघून गेले. त्यांच्याच्यानें थोडाच धीर धरवणार?

**अनिरुद्ध** — नलिनी, मला या बाबतींत विचार केला पाहिजे. मी जातों. पण मी तुझी कांहीं अगदींच निराशा करणार नाहीं. नानासाहेब येवढ्यांत खास येत नाहींत. मी लवकरच परत येतों. (जातो.)

**नलिनी** — काय असेल यांच्या या बोलण्याचा अर्थ? कां उगाच माझ्याशीं हे लपंडाव खेळताहेत? लवकरच परत येतों असं ते म्हणाले पण तेवढ्याच अवधींत नानासाहेब आले तर त्यांना मी काय उत्तर देऊं! छे; मला तर अगदीं सुचेनासं झालं आहे.

(दारावर थाप ऐकूं येते.)

**नलिनी** — कोण आहे तें?

**नाना०** — (बाहेरून) मी नानासाहेब जहागिरदार.

(नलिनी दार उघडते.)

**नाना०** — भाऊसाहेब कुठं आहेत?

**नलिनी** — भाऊसाहेबांना मी बोलावून आणत्यें. पण भाऊसाहेबांची गांठ घेण्यापूर्वीं मलाच तुमच्याशीं कांहीं बोलायचं आहे.

**नाना०** — माझ्याशीं ! आतां त्याची जरूर नाहीं. मला भाऊसाहेबांशीं बोलायचं आहे. रकमेची तजवीज झाली कीं नाहीं ? नाहींतर मी आतां फौजदारी दाखल करणार !

**नलिनी** — त्यांच्यावरील फौजदारी तुम्हांला उदार मनानं टाळतां येण्यासारखी आहे.

**नाना०** — मी काय म्हणून ही फौजदारी टाळावी ? त्या दिवशीं तूं बेगुमानपणें प्रॉमिसरी नोट फाडलीस ! तुला वाटलं आतां आपण निर्भय झालों. परंतु त्यामुळें तूं तुझ्या वडिलांवर व स्वतःवर अधिकच संकट ओढवून घेतलंस. नलिनी, आपण गुन्हा करीत आहों हें तुझ्या लक्षांत आलं नाहीं.

**नलिनी** — परंतु अपराधाला क्षमा ही असतेच. मी तुमच्याजवळ क्षमेची याचना करीत आहें. झालं गेलं तें सर्व विसरा, भाऊसाहेबांवर फौजदारी करूं नका; मी तुमची सहधर्मचारिणी व्हायला तयार आहें !

**नाना०** — पण हें खरं कशावरून ?

**नलिनी** — मी सांगत्यें म्हणूनच. नका, मनांत थोडीसुद्धां शंका येऊं देऊं नका. कशा रीतीनें सांगितलं असतां तुमची खात्री पटेल ?

**नाना०** — नलिनी, तूं मला पुनः पेंचांत टाकीत आहेस. आतां तूं जर माझ्याशीं लग्न केलंस तर मी भाऊसाहेबांवर फौजदारी करणार नाहीं; पण भाऊसाहेब कबूल झाले पाहिजेत ना ? आणि शिवाय तुलाहि बजावतों कीं आतांच्या या तुझ्या कबुलींत जर कपटनाटक असेल तर तें मला मुळींच खपायचं नाहीं.

**नलिनी**—मी तुमच्याशीं लग्न लावण्याची कबुली दिली, ती वर-पांगी नाहीं—

(भाऊसाहेब प्रवेश करतात)

**भाऊ०**—कोण? नानासाहेब! आणि नलिनी! वा:! नानासाहेब, माझ्यापासून तुम्हांला पैसे घ्यावयाचे असले तरी तुम्ही शिष्टाचार सोडायचं कारण नव्हतं. नलिनी, माझ्या पश्चात्, माझ्या परवानगी-वांचून, बेजबाबदारपणानं या म्हाताऱ्याशीं तूं कसल्या वाटाघाटी करीत होतीस?

**नाना०**—म्हातारा! मी म्हातारा! भाऊसाहेब, तुम्ही माझा उपमर्द करीत आहां!

**भाऊ०**—तुम्ही माझ्या केलेल्या उपमर्दापेक्षां कमीच असेल. नलिनी! जा तूं आंत जा. एक क्षणहि येथें उभी राहूं नको. जा आंत. (नलिनी जाते; अनिरुद्ध प्रवेश करतो.)

**अनिरुद्ध**—भाऊसाहेब, या गृहस्थानं आपल्या कल्पनेपेक्षां आपला अधिक उपमर्द केला आहे.

**नाना०**—काय?

**अनिरुद्ध**—काय! अहो या गृहस्थानं नलिनीशीं अतिप्रसंग करतांना मी दाराच्या फटींतून डोळ्यानं पाहिलं!

**नाना०**—काय हें माझ्यावर तुफान! भाऊसाहेब, यांतलं एक अक्षर देखील खरं नाहीं. तुमच्या मुलीला विचारा! अहो सद्‌गृहस्थ, विनाकारण माझ्यावर हें बालंट कां घेतां?

**अनिरुद्ध**—बालंट! ठीक आहे. भाऊसाहेब मी प्रत्यक्ष याला

नलिनीच्या अंगाला स्पर्श करतांना पाहिलं. तुम्ही येण्यापूर्वी हा गृहस्थ नलिनीशीं किती वेळ बोलत होता तें त्यालाच विचारा.

**नाना०**—तुमच्या धाडसीपणाची कमाल आहे! अहो, पण त्या मुलीला विचारा कीं—

**अनिरुद्ध**—तिला काय विचारा! कुलीन घराण्यांतील मुली अशा गोष्टी कुठं बोलत असतात काय? अहो, तुम्हांला एक नसेल अब्रूची काळजी पण त्या मुलीला आहे ना! लग्न व्हायचंय तिचं! भाऊसाहेब, या गृहस्थांना आतां जाऊं द्या.

**नाना०**—भाऊसाहेब, हें विनाकारण माझ्यावर बालंट आहे. माझं ऐका—

**भाऊ०**—माझी कांहीं ऐकण्याची इच्छा नाहीं. अनिरुद्धांना खोटं बोलण्याची जरूर काय? यांत माझ्या मुलीचा संबंध आहे म्हणून, नाहींतर मींच तुमच्यावर फौजदारी केली असती.

**अनिरुद्ध**—मी साक्ष द्यायला तयार आहें.

**नाना०**—फौजदाऱ्यांची गोष्ट कशाला आतां! मीही तुमच्यावर फौजदारी करीत नाहीं—

**अनिरुद्ध**—आतां कशाला कराल! तुमची शेंडी अडकली आहे ना?

**नाना०**—माझ्या सबंध आयुष्यांत, माझ्या अंगीं हें धादांत खोटं चिकटविणारे गृहस्थ आपणच भेटलांत. भाऊसाहेब, मी तुमच्या मुलीचा उपमर्द केला नाहीं. तुम्ही तुमच्या मुलीला विचारा. विनाकारण, फौजदारीची भाषा कां बोलतां?

**नाना०** — भाऊसाहेब, हे तुमच्या वाड्याचे कागदपत्र. नीट पाहून घ्या. आणि ही तुमच्या रकमेची पावती (पावती लिहितो) ही घ्या. मी पुन: तुम्हांला सांगतों कीं मी तुमच्या मुलीचा उपमर्द केला नाहीं. आतां तिचीच तशी म्हणण्याची तयारी असेल तर नशीब माझं. तोटका, चल बाबा, अरे या शिकलेल्या मुली काय करतील—

**अनिरुद्ध**—अहो, जा आतां. भाऊसाहेब कांहीं तुमच्यावर फौजदारी करणार नाहींत. जा.

**नाना०** — जातों बाबा. (एकीकडे) तोटक्या, शेवटीं कोठलीच मुलगी मिळाली नाहीं कीं रे !

**तोटक** — जाऊं द्या. धनीसाहेब चला, या प्रसंगाला धैर्यानं तोंड दिलं पाहिजे.

(तोटक व नानासाहेब जातात.)

**नलिनी** — भाऊसाहेब, ही रकम एकदम कोठून आली ? अन् मला तुम्ही कांहींच कसं सांगितलं नाहीं ? माझ्या जिवाला किती किती यातना झाल्या !

**मंदार** — रकम अनिरुद्धांनीं दिली.

**नलिनी** — त्यांनीं दिली ? हं ! कांहीं तरीच.

**चंद्रिका** — नलिनी, उतावीळपणा कशाला करतेस ? भाऊसाहेब आतां लवकरच सर्व खुलासा करतील.

**भाऊ०** — मी खुलासा तर करतोंच. पण नलिनी, अनिरुद्धांविषयीं तुझ्या मनांत कांहीं पूर्वग्रह असेल तर काढून टाक. दोष प्रत्येकांत असतातच. आणि परस्परांचे दोष काढून टाकण्याकरतांच, स्त्री व पुरुष यांची सांगड परमेश्वरानें घालून दिली आहे, व ती सांगड विवाहाच्या

रूपानें समाजानें स्थिर केली आहे. तूं अनिरुद्धांजवळ याचना केलीस, त्यांनीं तुला सपशेल नकार दिला नाहीं; परंतु त्यांचा तो अर्धवट होकार पुरा व्हावा म्हणून त्यांना मला आज उपयोगी पडावंच लागलं. नलिनी, आज सकाळीं तूं अनिरुद्धांशीं बोलत होतीस तेव्हां तुला न कळत तुझ्या व चंद्रिकेच्याहि संकटमुक्ततेची तयारी होत होती. सकाळीं नित्याप्रमाणें मी गीतेचा पाठ उरकला व देवपूजेच्या मोठ्या चौरंगाच्या खणांतली ज्ञानेश्वरीची जुनी हस्तालिखित प्रत सहज पाहून साफ करून ठेवावी म्हणून ती मी सोडली. बापूसाहेबांच्या मृत्यूनंतर तिला मी आजच हात लावला. कांहीं पानें उलट सुलट झालीं होतीं तीं नीट सारखीं करून ठेवीत असतांना, एका अध्यायांत, मला एक लिफाफा दृष्टीस पडला! अत्यंत कुतूहलानें मी तो वाचला. नलिनी, वाच बरं यांतला मजकूर.

**नलिनी** — खरंच, खरंच, भाऊसाहेब मीच वाचत्यें तें. "चि. भाऊ यांस, तुला मी भरपूर ठेवलंच आहे. पण लक्ष्मी चंचल, तिचा कोणीहि भरंवसा धरूं नये. या चौरंगाच्या खणाला एक चोरकप्पा आहे. प्रयत्न केल्यास तुला तो उघडतां येईल. त्या चोरकप्यांत चंद्रमंडळ नांवाचा एक अत्यंत तेजस्वी हिऱ्याचा दागिना आहे. तुजवर अगदीं अपरिहार्य संकट आलें तर त्याचा खुशाल उपयोग कर. त्याची किंमत पन्नास हजारांच्यावर सहज होईल". अगबाई! कुठं आहे, कुठं आहे तें चंद्रमंडळ?

**भाऊ०** — (चंद्रमंडळ बाहेर काढून) हें पहा तें चंद्रमंडळ! नलिनी! हें पत्र वाचतांच मला अतिशय आनंद झाला. प्रयत्नानं मी तो चोरकप्पा

उघडला आणि त्यांत मला हें तेजस्वी रत्न सांपडलं. परंतु हें रत्न या संकटप्रसंगीं माझ्या उपयोगी कसं पडणार याचाहि मला विचार पडला. नानासाहेबांचं समाधान कदाचित् या दागिन्यानं झालं नसतं. शिवाय त्याच्या घरीं हा दागिना जावा असंहि मला वाटेना. मी पूजा आटपली, व देवघराच्या लगतच्या खोलींत याचा विचार करींत येरझारा घालीत होतों. तों अनिरुद्ध मला दिसले. ते तुझ्याशीं बोलून परतच येत होते. कदाचित् त्यांच्या ओळखीनें या दागिन्याची रोख रक्कम करतां आली तर पहावी म्हणून मी त्यांना हा दागिना दाखविला. आणि—

**अनिरुद्ध**—नलिनी, तुला दिलेला अर्धवट होकार मी पुरा केला. हें रत्न दृष्टीस पडतांच, मी तें ताबडतोब विकत घेण्याचं ठरवलं. परंतु नगद रक्कम मजजवळ नव्हती. मी ताबडतोब मंदारांना मोटारींतून मुंबईस माझ्या पेढीवर पाठवून, ही रक्कम आणवली; स्नेहभावानं मंदारांनीं जायचं कबूल केलं, याबद्दल त्यांचे आभार मानले पाहिजेत. मी इथं राहिलों याचं कारण खोटेपणाशीं किती खोटेपणा करतां येतो हें मला नानासाहेबांना दाखवायचं होतं. नलिनी, मात्र तुझ्याशीं मी लपंडाव व खोटेपणा केला याबद्दल तूं मला क्षमा कर.

**मंदार**—आणि मलाहि तिनं क्षमा करावी. कारण मीहि तिला अत्यंत कठोरपणांत वाक्ताडन केलं आहे.

**भाऊ०**—नलिनी, अनिरुद्धांनीं तुझी आतां क्षमा मागितली आहे. जें तूं नुकतंच करायला तयार झाली होतीस तें आतांच कर. आतां लाजूं नको. (नलिनी लाजत पुढे येते. तिचा हात भाऊसाहेब अनिरुद्धाच्या हातांत देतात.)

**मंदार**—अनिरुद्ध, एका बरोबर हें दुसरंहि **चंद्रमण्डळ** संभाळा!

**भाऊ०** — मंदार, दैवाची लीला अगाधच. संकटांतून सुटायचंच असलं म्हणजे आपल्याला नकळतच कांहीं अदृश्य शक्ति कार्य करीत असतात व मागाहून आपल्या प्रयत्नांचं आपल्याला हंसू येतं. असो. नलिनीचा हात अनिरुद्धाच्या हातांत मी जसा दिला, तसा चंद्रिकेचा हात —

(गिरिजाबाई प्रवेश करून)

**गिरिजा०** — तें काम माझं आहे. मी येतच होत्यें इकडे माझं काम आटोपून. हं, ये ग बाई चंद्रिके, ये ना पुढं! इश्श! किती लाजतेस (चंद्रिकेचा हात मंदारांच्या हातांत देते) काय बाई तरी! दोघंजण एकाच दिवशीं पाहुणे आले आणि जांवई झाले!

**भाऊ०** — मंदार, अनिरुद्ध, या चंद्रमण्डळानं, आपणां सर्वांना आज हा सोन्याचा दिवस दाखविला. मी निश्चिंत झालों. आतां लवकरच मुहूर्त ठरवायला हवा.

**अनिरुद्ध** — लवकर ठरवा; कारण नलिनी चंद्रमण्डळ घालण्याला फार उत्सुक झाली आहे.

**नलिनी** — (त्याला, एकीकडे) इश्श, मोठ्या माणसांच्या देखत ही काय चेष्टा!

**भाऊ०** — मंदार, अनिरुद्ध, चला. ज्या ज्ञानेश्वरीच्या प्रतींत तो लिफाफा मला सांपडला ती ज्ञानेश्वरीची प्रत एकदां जरूर पहा. तिथेंच आपण मुहूर्त ठरवूं. चला.

(सर्व जातात. पडदा पडतो).

*** समाप्त ***

